॥ श्री ॥

श्रीवेदाङ्गार्थचन्द्रिका भाग १ ला

स[redacted]यार्थविवरणा

# श्री वे दा ङ्ग शि क्षा

लेखक,

काव्यालङ्कारभूषण पं. शिवरामशास्त्री शिंत्रे

शास्त्री, एल्फिन्स्टन कॉलेज, मुंबई.

किंमत ६ आणे.

॥ श्री ॥

श्रीवेदाङ्गार्थचन्द्रिका भाग १ ला

सान्वयार्थविवरणा

# श्री वेदाङ्ग शिक्षा



लेखक—

काव्यालङ्कारभूषण पं. शिवरामशास्त्री शिंत्रे

शास्त्री, एल्फिन्स्टन कॉलेज मुंबई.

प्रथम मुद्रण



इ. स. १९३३.

किंमत ६ आणे.

# प्रस्तावना



ह्या संपूर्ण जगतांतील [illegible] मनुष्यांचा ऐहिक व पारलौकिक उत्कर्ष आणि मोक्ष ह्यांचें मुख्य साधन म्हटलें म्हणजे अनादिनिधन वेदग्रंथांचें अध्ययन व त्यामध्यें सांगितलेल्या विधींचें यथाधिकार अनुष्ठान हेंच आहे. परंतु त्या वेदग्रन्थाचें पठन, अर्थज्ञान वगैरेंची सिद्धि, शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छन्द व ज्योतिष ह्या वेदषडंगांच्या व इतिहास पुराणादिक समर्थक ग्रन्थांच्या अध्ययनाशिवाय होणें मुळींच शक्य नाहीं, ह्याकरितांच याज्ञवल्क्य-स्मृतीमध्यें, चवदा धर्मस्थानांत व विद्यास्थानांत वेदांगादि ग्रन्थांची गणना केली आहे. प्राचीनकाळचे ऋषि तर वेदाध्ययनापूर्वीच वेदांगांचा अभ्यास करीत व त्यानंतर वेदाध्ययन करीत, असें महाभाष्याच्या पस्पशाह्निकांत पतञ्जलिमुनीनें लिहिलें आहे. अशा प्राचीन व सर्वमान्य शास्त्रीय ग्रन्थांचें ज्ञान हें, आधुनिक अभिनव ग्रन्थांचे व विद्यावृद्धीचे पायाच असतें. ह्याकरितां त्यांचें ज्ञान हल्लींच्या विद्याविषयक भरभराटीच्या कालांत दिग्दर्शक व उत्तेजक म्हणून संपादन करणें अवश्य आहे; शिवाय हल्लींच्या धार्मिक शैथिल्यास अल्पस्वल्प तरी प्रतिबंध करण्यास, एकंदरींत सर्वच प्राचीन वाङ्मयाचें ज्ञान अत्यावश्यक आहे, कारण त्यानें श्रद्धा व आस्तिक्यबुद्धि उत्पन्न होऊन वाढते. परंतु ते सर्व ग्रन्थ संस्कृत भाषेंत असून आतां त्या भाषेची अध्ययन-परंपरा बहुतक लुप्त झाल्यामुळें, सामान्य जनतेला त्यांतील विषय म्हणजे, जमिनींत पुरून ठेवलेल्या अज्ञात ठेव्याप्रमाणेंच अप्राप्य व दुर्बोध झाले

आहेत. सर्वत्र संस्कृत भाषेचा उत्कर्ष होऊन, लोक प्राचीन संस्कृतवाङमय स्वबुद्धीनें जाणू शकतील तो सुदिनच. परंतु तूर्त तरी त्याची फारशी आशा नाहीं. ह्याकरितां सर्व साधारण लोकांना, वर उल्लेख केलेल्या शिक्षा, कल्प, व्याकरण वगैरे वेदांगग्रन्थांचें यावच्छक्य ज्ञान, मराठी भाषेंत करून द्यावें, व विशेषतः अतिश्रद्धेनें वेदवेदांगें मुखोद्गत ठेवणाऱ्या वैदिकांची--त्यांना अर्थास्वादाची संवय करून देऊन--थोडीशी सेवा करावी ह्या बुद्धीनें आह्मी श्रीवैदिकधर्माश्रम पुणें ह्या संस्थेमध्यें संस्कृत शिक्षक असतां इतर व्यवसाय संभाळून सवडीनें 'वेदाङ्गार्थचन्द्रिका' ह्या नांवाची ग्रन्थमालिका लिहिण्यास वीस वर्षांपूर्वीच सुरवात केली होती. ह्या पुस्तकांच्या वाचनानें, प्राचीन ग्रन्थांचें महत्त्व कळून येऊन, लोकांचें चित्त संस्कृत भाषेच्या अध्ययनाकडें विशेष वळावें हाही एक दुसरा उद्देश आहे; शिवाय ह्यांनीं प्राचीन शास्त्रांच्या संरक्षणास व वर्धनासही साह्य होईल. ह्या मालेंत, यथावकाश क्रमानें सर्व वेदांगांचीं मराठी भाषांतरें, सविस्तर व सप्रमाण लिहिण्याचा हेतु असून जेथें अन्वयाची व अध्याहारांची जरूर असेल तेथें तेही लिहावयाचे आहेत त्यापैकीं आजपर्यंत शिक्षा, ज्योतिष, छन्द, निघण्टु हे वेदांग चतुष्टय; आश्वलायनगृह्यसूत्र आणि अष्टाध्यायी ( पाणिनीय व्याकरण ) ह्यांचें मराठी अर्थ लिहून तयार झाले आहेत. ह्यापुढें ऋक्प्रातिशाख्य व आश्वलायन श्रौतसूत्र ह्यांचा अर्थ करण्याचें काम हातीं घ्यावयाचें आहे. त्या मालेपैकीं हा पहिला वेदांग शिक्षेचा भाग आज प्रकाशित करीत आहों. ह्या ग्रन्थांत स्वरवर्णोच्चाराचें अथवा वेदादिकांचें शुद्ध पठन कसें करावें ह्याचें शिक्षण दिलें आहे ह्मणून ह्याला वेदांगशिक्षा असें नाव असून हें अंग सर्व वेदांगांत पहिलें मानिलें आहे, कारण वेदांगा-

मध्यें फक्त ह्याच अंगाचा आरंभ प्रारंभार्थक अथ शब्दानें झाला आहे. शिवाय पठनानंतरच अर्थज्ञान वगैरेंचा संभव असल्यामुळें पठनाविषयक अंगाला प्राथम्य असणें हें युक्तच आहे. ह्या शिक्षेला पाणिनीय शिक्षा असें ह्मणण्याचा परिपाठ असून हो, पाणिनीनेंच रचिलेली असावी असा पुष्कळांचा समज आहे. परंतु प्राचीन ग्रन्थांवरून व शिक्षेच्या उपलब्ध नाटक भाष्यावरून पाहतां; ही शिक्षा, श्रीपिंगलाचार्यानेंच रचिली आहे असें दिसतें. ही पाणिनीनें रचलेली नाहीं, कारण ह्या ग्रन्थांत पाणिनीला अनेक वेळां वंदन करून त्याची प्रशंसा केली असल्यामुळें प्रस्तुत शिक्षेचा कर्ता अर्थात् पाणिनीपेक्षां वेगळा असावा असें ठरतें.

आणखी ओभाव, विवृत्ति, ऊष्मा (विसर्ग) वगैरे ह्या शिक्षा ग्रन्थांतल्या बऱ्याच संज्ञा पाणिनीय व्याकरणाप्रमाणें नसून प्रातिशाख्यग्रन्थास जुळणाऱ्या आहेत मात्र मी पाणिनीयमताप्रमाणें शिक्षा सांगतों असें स्वतः शिक्षाकारच पहिल्या प्रतिज्ञेच्या श्लोकांत म्हणत असून त्याच्या परंपरेची स्तुति करीत आहे व अनेक पाणिनीय संज्ञा परिभाषांचाही उपयोग करीत आहे. ह्याकरितां. पाणिनीयशिक्षा असाच हिच्याविषयीं लोकप्रवाद आहे कदाचित् प्राचीनकालीं ह्या ग्रन्थाला आधारभूत अशी एकादी स्वतः पाणिनीनें केलेलीही शिक्षा असेल व तिचा आशय मनांत धरून पिंगलाचार्यानें ही सुबोध शिक्षा रचली असेल. आतां हा पिंगल व छन्दः सूत्रकार पिंगल एकच कीं वेगवेगळे ह्याला निर्णायकप्रमाण मला आढळलें नाहीं; दोघेही शिवोपासक असावे इतकें मात्र अन्तःप्रमाणावरून वाटतें असो. ह्या व इतर वेदांगाच्या विषयीं अधिक माहिती ह्या पहिल्या भागांत व पुढील भागांमधूनही प्रसंगानें येईलच

प्रत्येक ग्रंथाचें भाषांतर व विवरण काळजीपूर्वक लिहिण्याचा आमचा निश्चय आहे परंतु आधींच हे ग्रन्थ फार पुरातन त्यांची अर्थाध्यापनाचीं परंपरा लुप्त झालेली, बरेचसे पाठभेद, जुनीं भाष्यें व टीका प्रायः दुर्लभ, मिळाल्यास संदिग्ध व त्रोटक अशा स्थितींत आहे त्या सामग्रीवर शास्त्रान्तरांच्या ज्ञानावर व स्वतःच्या वाचनमननांवरच भाषान्तराची भिस्त असल्यामुळें कदाचित नजरचुकीनें दोष किंवा संदेह कचित स्थळीं राहून जाण्याचा संभव आहे. दयाळू व विद्वान वाचकांनीं अशा स्थळांचा उल्लेख करून स्वतःचे मतभेद मला कळविल्यास माझ्या संकल्पित कृत्यास त्याचें मोठें साहाय्य होईल व त्याबद्दल मी त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार मानीन व पुनर्मुद्रणाचे वेळीं त्यांच्या सूचनांचा पूर्ण विचार करीन. भ्रान्तिः पुरुषधर्मः हा सामान्य सिद्धांत ध्यानांत ठेवूनही आम्हीं ही भाषांतरें लिहित आहों कारण जरी सर्वज्ञ व सर्वशक्तिमान कोणीही मनुष्य नाहीं तथापि त्यानें उत्कर्षाचा यत्न केलाच पाहिजे. यथाशक्ति इमारत बांधून ठेवल्यास तिच्या रंगरंगोटीचें व दुरुस्तीचें काम करणारे कोणीही निर्मत्सर व्यवसायबांधव पुढें मिळतील व कृतकार्यास पूर्णता आणतीलच अशा भरंवशानें काम करीत गेले पाहिजे. शास्त्रीयग्रन्थांची वाढ अशाच विश्वासानें व पद्धतीनें होत आली आहे. अशाप्रकारानें पायापासून शेवटपर्यंत सर्व श्रम एकट्यासच करावे लागत नाहींत व तो गोष्ट जवळ जवळ अशक्यही आहे. पाणिनीला सुमारे सव्वीसशे वर्षं झालीं असून पिंगलाचार्यांना बावीसशे वर्षें झालीं असावी असें, आधुनिक शोधक ऐतिहासिकांचें मत आहे. वेदसंहितांच्या पठनाइतकी काळजी न घेतल्यामुळें,

शिक्षादि वेदाङ्ग ग्रन्थांतून बरेच पाठभेद झाले आहेत, परंतु त्यांपैकीं सप्रमाण व योग्य असा जो पाठ वाटला तोच एक निश्चित करून, आम्ही भाषांतर केलें आहे, इतर पाठ कमी विश्वसनीय वाटल्यामुळें त्यांची उपेक्षा केली आहे. त्यांचा उल्लेख मूल ग्रन्थांतून जागोजाग येईल. ह्या पुढचे भागही क्रमानें अशाच प्रकारें, सोईप्रमाणें प्रसिद्ध करण्याचा मानस आहे; पुस्तकाच्या शेवटीं मुख्य चुकांचें शुद्धिपत्र जोडलें आहे त्याप्रमाणें शुद्ध करून मग वाचावें अशी प्रार्थना आहे. असो, शेवटीं आमच्या वेदांगार्थचंद्रिकेचा हा पहिला भाग जगदात्मक श्रीपरमेश्वरास अर्पण करून ही प्रस्तावना पूर्ण करतों.

आषाढ शुद्ध ११
मंगळवार
शके १८५५

**शिवराम विद्याधर शित्रे**
**संस्कृतशास्त्री एल्फिन्स्टन कॉलेज**
**मुंबई.**

॥ श्री ॥

## सान्वयार्थविवरणा

# श्रीवेदाङ्गशिक्षा ॥

**अथ शिक्षां प्रवक्ष्यामि पाणिनीयं मतं यथा ।**
**शास्त्रानुपूर्वं तद्विद्याद्यथोक्तं लोकवेदयोः ॥ १ ॥**

**अन्वयः** ॥ अथ ( अहम् ) यथा पाणिनीयं मतं ( तथा ) शिक्षां प्रवक्ष्यामि, तत् ( तेन ) यथा लोकवेदयोः उक्तम् ( तथा ) शास्त्रानुपूर्वम् ( अत्र ) विद्यात् ॥

**अर्थ व विवरण**—समग्र वेदाचें अध्ययन झाल्यानंतर किंवा त्याच्या पूर्वीं शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद आणि ज्योतिष ह्या सहाही वेदांगांचे अध्ययन करणें अवश्य आहे. कारण ‘ षडङ्गो वेदोऽध्येयो ज्ञेयश्च ’ ह्मणजे शिक्षादिक सहा अंगानीं युक्त अशा वेदाचें अध्ययन करून त्यांचा अर्थ जाणावा; असें शास्त्र आहे. म्हणून मी पिंगलाचार्य ( शिक्षासूत्रकार ), स्वर आणि वर्ण ह्यांच्या शुद्ध उच्चारणाचें बोधक जें शिक्षानामकशास्त्र तें पाणिनीच्या व्याकरणशास्त्राला अनुसरूनच ह्यापुढें सांगणार आहे. ह्मणून ह्यांतील संज्ञापरिभाषादिकांचा क्रम व संप्रदायपरंपरा, हीं पाणिनीच्या शास्त्रा-

प्रमाणेंच असून, ह्यामधील विषयही त्या शास्त्राप्रमाणेंच लोकभाषा व वेद ह्या दोहोनांही उपयोगी आहे. शिक्षेचे बहुतेक श्लोक अनुष्टुप् आहेत, विशेष असेल तेथें वृत्तें लिहित जाऊं ॥ १ ॥

**प्रसिद्धमपि शब्दार्थमविज्ञातमबुद्धिभिः ॥**
**पुनर्व्यक्तीकरिष्यामि वाच उच्चारणे विधिम् ॥ २ ॥**

**अन्वयः**—॥ शब्दार्थम् प्रसिद्धमपि अबुद्धिभिः अविज्ञातम् (आस्ति, अतः) वाचः उच्चारणे विधिम् पुनः व्यक्तीकरिष्यामि ॥

**अर्थ**— ह्या शिक्षाशास्त्रांमधील पारिभाषिक वैगेरे शब्द व त्यांचे अर्थ वस्तुतः विचार करतां, उच्चारणाचा व्यवहार व पाणिनीयादिक शास्त्रें ह्यांमध्यें प्रसिद्ध आहेत. परंतु लोकव्यवहार आणि शास्त्रें ह्यांत कुशलबुद्धि नसलेल्या लोकांना, ते माहीत होत नाहींत, ह्याकरितां, मी ( सूत्रकार ) ह्या शास्त्रांत वाणीच्या उच्चारणाचा प्रकार, पुन्हां स्पष्टपणें प्रतिपादन करणार आहे; व त्यांत प्रसंगोपात्त असे, नवीनही कांहीं विषय सांगेन. ॥ २ ॥

**त्रिषष्टिश्चतुःषष्टिर्वा वर्णाः सम्भवतो मताः ।**
**प्राकृते संस्कृतेचापि स्वयंप्रोक्ताः स्वयंभुवा ॥ ३ ॥**

**अन्वय.** ॥ प्राकृते संस्कृतेच सम्भवतः त्रिषष्टिः चतुःषष्टिर्वा वर्णाः मताः ( सन्ति ) स्वयंम्भुवापि ( च ) स्वयं प्रोक्ताः ( सन्ति ) ॥

**अर्थ**—प्राकृत वैगेरे इतर भाषांमध्यें व संस्कृत भाषेमध्येंही पाणिन्यादिक शास्त्रकारांनीं; एकंदर त्रेसष्ट किंवा मतभेदानें चौसष्ट वर्ण संभवारून मानले

आहेत. आणि स्वतः ब्रह्मदेयानेंही ऋषीनां वेदोपदेश करतांना इतक्याच वर्णांचा आदरानें उच्चार केला आहे ॥ ३ ॥

**स्वर विंशातिरेकश्च स्पर्शानां पञ्चविंशातिः ।**
**यादयश्च स्मृता ह्यष्टौ चत्वारश्च यमाः स्मृताः ॥ ४ ॥**
**अनुस्वारो विसर्गश्च ≍ क ≍ पौ चापि पराश्रयौ ॥**
**दुःस्पृष्टश्चेति विज्ञेय ऌकारः प्लुत एवच ॥ ५ ॥**

**अन्वयः** ॥ स्वराः हि विंशतिः एकश्च ( सन्ति ) स्पर्शानां पञ्चविंशतिः ( अस्ति ). यादयश्च अष्टौ स्मृताः ( सन्ति ) यमाश्च चत्वारः स्मृताः (सन्ति) अनुस्वारः, विसर्गश्च पराश्रयौ ≍ क ≍ पौ अपिच दुःस्पृष्टश्च इति ( गणः ) विज्ञेयः प्लुतः ऌकारः एवच ( अस्ति ) ॥

**अर्थ व विवरण**—त्या त्रेसष्ट किंवा चौसष्ट वर्णांची गणना अशी आहे. वीस आणि एक मिळून एकवीस स्वर क ख ग वगैरे मकारापर्यंत एकंदर पंचवीस स्पर्शसंज्ञक वर्ण, यकारादिक हकारापर्यंत असणारे आठ वर्ण. यम नांवाचें चार वर्ण, अनुस्वार, विसर्ग, आणि पुढें येणारे क ख व प फ हे वर्ण ज्यानां आश्रय आहेत असे ≍ क ≍ प ह्मणजे अर्ध विसर्गासारखे ऐकूं येणारे जिव्हामूलीय आणि उपध्मानीय नांवाचे दोन वर्ण,, आणखी ईष-त्स्पृष्ट प्रयत्न असलेला ऋकाररूपी किंवा ऌकाररूपी दुःस्पृष्टवर्ण, ह्या सर्वांची बेरीज करून येणारे त्रेसष्ट वर्ण आहेत असे इतर आचार्यानीं मानिलें आहे. आणि आमच्या ( सूत्रकार ) मतानें प्लुत ऌकार हा चौसष्टावा वर्ण

आहे ही अक्षरांची गणना नीट लक्षांत येण्याकरितां पाणिनीय व्याकरणाला अनुसरून तिचें विस्तृत विवरण करतो.

अ इ उ ऋ हे चार स्वर प्रत्येकी ऱ्हस्व दीर्घ व प्लुत ह्या तीन प्रकारांनीं एकंदर मिळून बारा होतात. ऌकार केवळ ऱ्हस्वच आहे, कारण त्याचे दीर्घ व प्लुत हे प्रकार नाहींत.

ए ओ ऐ औ हे चार स्वर प्रत्येकी दीर्घ व प्लुत ह्या दोन जातीनीं आठ होतात; कारण त्यानां ऱ्हस्व हा प्रकार नाहीं. ह्याप्रमाणें एकंदर स्वर [ १२+१+८=२१ ] एकवीस होतात. एक मात्रा—[ क्षण ] कालांत ज्याचा उच्चार होतो तो ऱ्हस्व स्वर, दोन मात्रांत ज्याचा उच्चार होतो तो दीर्घ, व तीन मात्रा ज्याच्या उच्चाराला लागतात तो प्लुत स्वर होय. व्यञ्जनाचा उच्चार अर्धमात्रेंत ह्मणजे ऱ्हस्वाहून निम्या कालांत होतो असें समजावें, क, ख, ग वगैरे म पर्यंत पांच वर्गांचे मिळून पंचवीस वर्ण, वर्णमालेंत प्रसिद्धच आहेत. त्यांचा स्पृष्ट नांवाचा आभ्यंतर प्रयत्न आहे, ह्मणून त्यांना स्पर्श असें नांव व्याकरणशास्त्रांत दिले आहे. वर्णोत्पत्तीच्या पूर्वी, जो मुखादिकस्थानांत त्यांची उत्पत्ति करणारा प्रयत्न होतो त्याचें नांव आभ्यन्तर प्रयत्न होय; आणि वर्णांच्या उत्पत्तिनंतर त्यांच्या विकासाकरितां, जो प्रयत्न लागतो त्याचें नांव बाह्यप्रयत्न अथवा अनुप्रदान असें समजावें. य व र ल श ष स ह हे यादिक आठ वर्ण जाणावे. वर सांगितलेल्या क च ट त प ह्या पांच वर्गांतील प्रत्येक वर्गाच्या पहिल्या चार वर्णापैकीं कोणत्याही वर्णापुढें,

ञ म ङ ण न ह्यापैकीं अनुनासिक अक्षर आले असतां, त्या दोहोंमध्यें पूर्व-वर्णासारख्या बाह्यप्रयत्नांनीं युक्त असून, स्वतः अनुनासिक असा एक नवीनच वर्ण उत्पन्न होतो, त्याचें नांव यम होय. हे यम प्रातिशाख्यग्रंथांत व वेद-पठनांत प्रसिद्ध असून एकंदर चारच आहेत. कारण त्या पांच वर्गांतील सर्व मिळून वीस असणाऱ्या वर्गांतील आद्य चार चार वर्णांच्या बाह्य प्रयत्नामध्यें, चारच जाति आहेत. म्हणून यम चारच आहेत. पलिक्क्नीः, चख्ख्नतुः, अग्ग्निः, घ्घ्नन्ति. हीं चारी यमांची उदाहरणें आहेत. ह्या उदाहरणांमध्यें नकारापूर्वी असून वर आडवी रेघ दिलेले क् ख् ग् घ् हे चार वर्ण यम आहेत. पांची वर्गांतील पहिल्या वर्णांचे बाह्यप्रयत्न, अल्पप्राण, विवार, श्वास, अघोष असे आहेत. दुसऱ्या वर्णांचे महाप्राण, विवार, श्वास, अघोष असे आहेत. तिसऱ्या वर्णांचें अल्पप्राण, संवार, नाद, घोष असे आहेत. चवथ्या वर्णांचें बाह्यप्रयत्न, महाप्राण, संवार, नाद, घोष असे आहेत. त्यामुळें त्या वीस वर्णांपैकीं पांच पांच वर्णांचा एक एक प्रकार असे एकंदर यमांचे चार प्रकार होतात. अनुस्वार व विसर्ग प्रसिद्धच आहेत. 'कुप्वोः ≍ क ≍ पौ च' ह्या पाणिनीच्या सूत्रानें, एकदां (पाक्षिक) क ख पुढें असतां. विसर्गाला अर्ध विसर्गासारखा जिव्हामूलीय आदेश होतो. हा शास्त्रांत प्रसिद्ध असून त्याचा विसर्गापेक्षां लिपिभेद वर दिलाच आहे. त्या दोहोंतील उच्चारणाचा फरकही, दोन्हीं पदें जोडून म्हटलीं असतां वर दिलेला अर्धविसर्ग व तोडून म्हटली असतां पूर्ण विसर्ग असा स्पष्ट अनुभवास येतो. उदाहरण जसें= अंतःकरण हा अर्धविसर्गासारखा जिव्हामूलीय व रामः स्मरति हा पूर्ण विसर्ग आहे.

वर दिलेल्याच सूत्रानें, प फ पुढें असतां, विसर्गाचे जागीं विकल्पानें उपध्मानीय नांवाचा अर्धविसर्गतुल्य आदेश होतो. ह्याचाही शुद्ध विसर्गापेक्षां फरक वर लिहिल्याप्रमाणेंच जाणावा. मात्र बहुतेक स्थलीं ह्या अर्ध व पूर्ण-विसर्गांच्या लिपिमध्यें फरक करीत नाहींत. उदाहरण जसें=' पयःपानम् ' हा उपध्मानीय, व यशःपाहि हा शुद्ध विसर्ग होय. क ख आणि प फ पुढें असतील तरच हे जिव्हामूलीय व उपध्मानीय होतात म्हणून सूत्रामध्यें त्यांना ' पराश्रय ' असें म्हटलें आहे. ' ऋति सवर्णे ऋवा ' व ' ऌति ऌवा ' ह्या कात्यायनाच्या वार्तिकांनीं ऋहून पुढें, ऱ्हस्व ऋ किंवा ऌ आले असतां दोहोंचें स्थानीं विकल्पानें द्विमात्र व ईषत्स्पृष्ट-( दुःस्पृष्ट ) प्रयत्नानें युक्त असे ऋकार व ऌकार अनुक्रमानें होतात. जसें=होतृ+ऋकारः=होतृकारः होतृ+ऌकारः= होत्ऌकारः. नेहमींच्या प्रसिद्ध ऋकार ऌकारांचा विवृत प्रयत्न असून ह्यांचा ईषत्स्पृष्ट ( दुःस्पृष्ट ) नांवाचा प्रयत्न आहे. त्यांच्या व ह्यांच्या उच्चारांत मात्र सूक्ष्म फरक आहे, लिपीमध्यें भेद करीत नाहींत. ह्या नवीन वर्णांत स्थानींच्या (मूळचे ऋ ऌ) सादृश्यानें अनुक्रमें एकमात्रिक अर्थात् दोन र् व दोन ल् आणि त्यांच्या सभोंवतीं सारखेच एकमात्रिक स्वरत्त्वाचे वेष्टन ( अज्भक्ति ) आहे, म्हणून हे दोन्हीं वर्ण द्विमात्र असून ईषत्स्पृष्टत्वरूपी साम्यानें मागें दिलेल्या शिक्षासूत्रांत ' दुःस्पृष्ट ' ह्या नांवानें हा त्रेसष्टावा एकच वर्ण मानिला आहे. ह्यांची विशेष माहिती कौमुदी व शब्देन्दुशेखर वगैरे व्याकरण ग्रन्थांत मिळेल. परंतु हल्लीं मुद्रित असलेल्या त्रोटक शिक्षा भाष्यांत ' अनुस्वारौ विसर्गश्च ' असें पाठांतर कल्पून ' अनुस्वारौ ' ह्या सूत्रांतल्या पदावरून ऱ्हस्वानुस्वार व दीर्घानुस्वार असे दोन प्रकारचे अनुस्वार आहेत, असा अर्थ केला असून

ह्यानेंच चौसष्ट संख्या पूर्ण होते असें लिहिलें आहे; आणि ह्यांस प्रमाण म्हणून, " अनुस्वारावं आं इत्यनुस्वारौ ऱ्हस्वदीर्घौ दीर्घाद्ध्रस्वो वर्णः " असें औदव्रजि आचार्यांचें वचनही दिलें आहे. तसेंच शब्दकौस्तुभांत पंडिताग्रणी श्री भट्टोजिदीक्षितांनीं, ' तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम् ' ह्या सूत्रावर यमांच्या वर्णनांत, ' त्रिषष्टिश्चतुःषष्टिर्वा ' हें शिक्षेचें प्रतीक प्रसंगानें घेऊन त्यावर लिहितांना " द्वयोश्चास्य स्वरयोर्मध्यमेत्य संपद्यते स डकारो ळकारः ॥ ळ्हकारतामेति स एव चास्य ढकारः सन्नूष्मणा संप्रयुक्तः ॥१॥ " म्हणजे शाकलसंहितेंत दोन स्वरांमधल्या डला ळ होतो, व ढला ळ्ह होतो;म्हणजे मूळचे ड ढ दुःस्पृष्ट होतात. अर्थात् चांगल्या रीतीनें स्वस्थानीं स्पृष्ट होत नाहींत; ( जसें अग्निमीडेचे जागीं अग्निमीळे होतें, व साढाचे जागीं साळ्हा असें होतें, कारण ह्यांतील ड च्या व ढ च्या मागें आणि पुढेंही स्वर आहेत. )

ह्या प्रातिशाख्य वाक्यास अनुसरून, ळकार व ळ्हकार ह्या दोहोंतील दुःस्पृष्टत्व साम्यानें हा एकच दुस्पृष्ट नांवाचा त्रेसष्टावा वर्ण मानावा असें लिहिलें आहे. परंतु तो ळ किंवा ळ्ह फक्त त्याच म्हणजे शाकलशाखेपुरताच असल्यानें चारी वेदास समान असणाऱ्या शिक्षामतास धरून नाहीं, आणि पाणिनीयशास्त्रांत कोठेंही ळ, ळ्ह, नसल्यानें ' पाणिनीयं मतं यथा ' ह्या आरंभींच केलेल्या प्रतिज्ञेसही अनुसरलेला दिसत नाहीं. माझ्या बुद्धीस प्रसिद्ध पाठाचा सरळ अर्थ वाटला तो दिला आहे. मतांची युक्तायुक्तता ठरविण्याचें काम अधिक शोध करून विद्वद्वर्य करतील. माझ्या मतानें शिक्षासूत्रांतील ' दुःस्पृष्टश्च ' ह्या चकारानें व त्या पुढच्या इतिकारानें ऌकाराप्रमाणें ऋकारही दुःस्पृष्ट आहे तो घ्यावा असें सुचविलें आहे; आणि ऌकाराचा संबंध मध्यमणि न्यायानें, मागच्या व पुढच्या दुःस्पृष्ट आणि प्लुत ह्या दोन्हीं पदांकडे

लावून दुःस्पृष्ट ऌकार आणि प्लुत ऌकार असा अर्थ केला आहे. औदव्रजि वगैरे आचार्यांनीं दोन अनुस्वार मानिले आहेत त्यांच्या मतानें दुःस्पृष्ट हें पद प्लुत ऌकाराचेंच विशेषण केलें असावें असें वाटतें; कारण असें न मानिलें तर वर्णसंख्या पासष्ट होऊं लागेल. असो. एकंदरींत शिक्षेंतील दुःस्पृष्ट शब्दाचा अर्थ, भट्टोजिमतानें, ळ ळ्ह, आमच्या मतानें ईषत्स्पृष्ट ऋ ऌ व औदव्रजिमतानें प्लुत ऌकाराचें विशेषण असा तीन प्रकारचा झाला आहे. असो, आतां चौसष्टाव्या वर्णाकडे वळतो. बहुत लोकांच्या मतानें ऌकाराला दीर्घाप्रमाणें प्लुत स्वरही नाहीं, परंतु 'क्लृप्तशिख' इत्यादि उदाहरणांत 'गुरोरनृतोऽनन्त्यस्याप्येकैकस्य प्राचाम्' ह्या पाणिनीच्या सूत्रानें प्लुत ऌकार संभवत आहे. म्हणून शिक्षाकारानें पाणिनीय मताला अनुसरून प्लुत ऌकार हा चौसष्टावा वर्ण मानिला आहे. ह्याप्रमाणें एकंदर त्रेसष्ट किंवा चौसष्ट ह्या वर्णसंख्येची उपपत्ति झाली. ॥ ४ ॥ ५ ॥

**आत्मा बुध्द्या समेत्यार्थान्मनो युङ्क्ते विवक्षया ॥**
**मनःकायाग्निमाहन्ति स प्रेरयति मारुतम् ॥ ६ ॥**

**अन्वय** ॥ आत्मा बुध्द्या अर्थान् समेत्य विवक्षया मनः युङ्क्ते मनः कायाग्निम् आहन्ति सः ( च ) मारुतम् प्रेरयति ॥

**अर्थ**—जीवात्मा प्रथमतः आपल्या बुद्धीनें अर्थांचा पूर्ण निश्चय करून, ते अर्थ इतरांनां कळविण्याच्या इच्छेनें, बुद्धिवृत्तिरूप मनास प्रेरणा करतो. नंतर ते मन नाभिस्थानीं असलेल्या जठराग्नीला धक्का देतें; व त्यानंतर तो जठराग्नि आपल्या जवळ संचार करणाऱ्या प्राणवायूला वर जाण्याची प्रेरणा करतो ॥ ६ ॥

मारुतस्तूरसि चरन्मन्द्रं जनयति स्वरम् ॥
प्रातःसवनयोगं तं छन्दो गायत्रमाश्रितम् ॥ ७ ॥
कण्ठे माध्यन्दिनयुगं मध्यमं त्रैष्टुभानुगम् ॥
तारं तार्तीयसवनं शीर्षण्यं जागतानुगम् ॥ ८ ॥

**अन्वयः**—॥ मारुतस्तु उरसि चरन् (सन्) प्रातःसवनयोगं गायत्रं छन्दः आश्रितम् मन्द्रं स्वरं जनयति; कण्ठे (चरन् सन्) माध्यन्दिनयुगं त्रैष्टुभानुगम् मध्यमम् तं (जनयति); शीर्षण्यं (च) तार्तीयसवनं जागतानुगम् तारम् (तं जनयति)

**अर्थ**—त्यापुढें तो वायु हृदयस्थानांत वावरत असतां, प्रातःसवनाला उपयोगी व गायत्री छंदाचा आश्रय केलेला असा मंद (हलका) आवाज उत्पन्न करतो. यज्ञामध्यें प्रातःकालीं सोमरस काढीत असतां, त्या सोमाची स्तुति करणारे मंत्र म्हणतात; त्यानांही लक्षणेनें प्रातःसवनच म्हणतात. वस्तुतः प्रातःसवन म्हणजे सकाळचें सोमरस काढणें होय. ह्याचप्रमाणें माध्यंदिन म्हणजे मध्यान्हकाळचें व तृतीय अथवा सायंसवन म्हणजे संध्याकाळचे सोमरस काढणें व त्याचे संबंधीं मंत्र समजावे. ह्या वर दिलेल्या सूत्रावरून पाहतां प्रातःसवनांत गायत्रीछंद व लहान आवाज असावा असें ठरते. तोच वायु कंठांत संचार करीत असतां, माध्यंदिन सवनास उपयोगी व त्रिष्टुप्छंदाचा आश्रय करणारा असा मध्यम स्वर उत्पन्न करतो; आणि मस्तकांत संचरत असतां, सायंकालीन तृतीय सवनाला उपयोगी व जगतीछंदाचा आश्रय केलेला अशा उंच स्वरास उत्पन्न करतो. ह्या गायत्री वगैरे छंदांचीं स्वरूपें व लक्षणें वेदांग छंदाच्या विवरणांत आम्हीं सविस्तर देणार आहोंत, म्हणून येथें देत

नाहीं. सांप्रतकालीं, वर आलेल्या तिन्हीं सवनांचा; हलक्या आवाजांत मध्यम आवाजांत व उंच आवाजांत वेद वगैरेचें पठन करणें, असाच अर्थ बहुधा मानितात, ह्या श्लोकावरून माध्यन्दिन सवनांत मध्यम आवाज व त्रिष्टुप्छंद असावा आणि तृतीयसवनांत उंच आवाज व जगतीछंद असावा असें दिसून येते. ॥ ७ ॥ ॥ ८ ॥

**सोदीर्णो मूर्ध्न्यभिहतो वक्त्रमापद्य मारुतः ॥**
**वर्णाञ्जनयते तेषां विभागः पञ्चधा स्मृतः ॥ ९ ॥**
**स्वरतः कालतः स्थानात्प्रयत्नानुप्रदानतः ॥**
**इति वर्णविदः प्राहुर्निपुणं तन्निबोधत ॥ १० ॥**

**अन्वयः**—उदीर्णः स मारुतः मूर्ध्नि अभिहतः ( सन् ) वक्त्रम् आपद्य वर्णान् जनयते, तेषां विभागः स्वरतः कालतः स्थानात् प्रयत्नानुप्रदानतः (च) पञ्चधा स्मृतः ( अस्ति ) इति वर्णविदः प्राहुः तं निपुणं निबोधत ॥

**अर्थ व विवरण**—वरच्या दोन श्लोकांत जठराग्नीनें धक्का दिलेला वायू हृदय, कंठ व शीर्ष ह्या स्थानांमध्यें येऊन क्रमानें, मंद्र, मध्यम आणि उंच असे ध्वनि उत्पन्न करतो असें सांगितलें; आतां त्या ध्वनींनां वर्णत्व कसे येतें हें सांगतात. वर जाण्याविषयीं प्रेरणा दिलेला तो वायू, वेगानें शिरःकपाटा-पर्यंत जाऊन तेथें आघात पावतो; व त्यापुढें जाण्यास सवड नसल्यामुळें तो पुन्हां उलट मुखामध्यें येऊन बाहेर पडत असतां, वर्ण उत्पन्न करतो. त्या वर्णांचा विभाग पांच प्रकारचा आहे. ज्याप्रमाणें एखाद्या अलगुजांतून (पावा) वारा जातांना, त्याची निरनिराळीं छिद्रें दाबलीं असतां भिन्नभिन्न सूर निघ-तात; त्याचप्रमाणें तो वायु ध्वनिस्वरूपासह मुखांतून बाहेर जात असतां, जिभेच्या निरनिराळ्या स्थानीं होणाऱ्या स्पर्शांमुळें व मुखाच्या कमजास्त

विकासादिक इतर यत्नांनीं त्याचे अनेक प्रकारचे वर्ण होतात असें समजावें. तो वर्णांचा पांच प्रकारचा विभाग; स्वरभेदामुळें, कालभेदामुळें, स्थानभेदामुळें प्रयत्न–( आभ्यन्तर ) भेदामुळें व अनुप्रदान म्हणजे बाह्यप्रयत्न ह्यांच्या भेदामुळें झाला आहे; असें वर्णोत्पत्तिशास्त्र जाणणारे विद्वान् बोलतात. त्या पञ्चधा विभागाचे ह्या पुढे स्पष्ट वर्णन करीन तें लक्षपूर्वक जाणून घ्या. आत्मा प्रथमतः अर्थाचा नीट निश्चय करून, ते दुसऱ्यास समजावून देण्याकरितां मन, जठराग्नि वगैरे परंपरेनें त्या अर्थांच्या सांकेतिक वर्णांची उत्पत्ति करवितो असें सहाव्या श्लोकांत सांगितलें आहे, त्यावरून अर्थबोधक जे ध्वनि, तेच वर्ण समजावे. ह्याकरितांच शिंक, उचकी, ढेंकर वगैरे ध्वनीनां, वर्णत्वाचा व्यवहार नाहीं; कारण ते केवळ शरीरधर्म असून आत्म्यानें अर्थबोधनाकरितां बुद्धिपूर्वक प्रेरणा केलेले नसतात. ॥ ९ ॥ ॥ १० ॥

**उदात्तश्चानुदात्तश्च स्वरितश्च स्वरास्त्रयः ॥**
**ह्रस्वो दीर्घः प्लुत इति कालतो नियमा अचि ॥ ११ ॥**

**अन्वयः**–॥ अचि उदात्तश्च अनुदात्तश्च स्वरितश्च ( इति) स्वराः त्रयः ( सन्ति ) ह्रस्वः दीर्घः प्लुतः इति कालतः नियमाः ( सन्ति )

**अर्थ व विवरण**–आतां ह्या सूत्रापासून स्वर, काल वगैरे पांच प्रकारांनीं होणाऱ्या वर्णविभागाचा विस्तार करतात. उदात्त, अनुदात्त व स्वरित हे तीन स्वर, स्वरांचें ( अच् ) विभाजक आहेत; व ऱ्हस्व, दीर्घ आणि प्लुत हे स्वरधर्म कालद्वारा स्वरांचेच विभाजक आहेत.

ह्या व पुढें येणाऱ्या सूत्रांत असलेल्या अच् यण्, वगैरे संज्ञांचा अर्थ समजण्याकरितां स्पष्ट विवरण देतो. ह्या शास्त्रांतल्या संज्ञा वगैरे पाणिनीय

शास्त्राला अनुसरून आहेत असें पूर्वी प्रतिज्ञेच्या वेळीं पहिल्या श्लोकांतच सांगितलें आहे. पूर्वी पाणिनिमहर्षीनें विद्याप्राप्तिकरतां तपश्चर्या केली असतां, श्रीशंकरानीं प्रसन्न होऊन त्याला, तूं व्याकरणशास्त्राचा कर्ता होशील असा वर दिला व संक्षिप्त संज्ञा जुळवण्याकरतां, वेदराशींतून निवडून काढलेलीं चवदा सूत्रें दिलीं. तीं सूत्रें अशीं.—अइउण्, ऋऌक्, एओङ्, ऐऔच्, हयवरट्, लण्, ञमङणनम्, झभञ्, घढधष्, जबगडदश्, खफछठथचटतव्, कपय्, शषसर्, हल्. हीं सूत्रें महेश्वरानें दिलेलीं असल्यामुळें त्यांना माहेश्वर सूत्रें असें म्हणतात. ह्या सूत्रांवरून जुळवलेल्या वर्णांच्या संक्षिप्त संज्ञानां प्रत्याहार ह्मणतात. हे प्रत्याहार बांधण्याची रीति पाणिनीनें 'आदिरन्त्येन सहेता' ह्या सूत्रानें सांगितली आहे. ह्याचा अर्थ लिहितो. वरच्या चवदा सूत्रांच्या शेवटीं, जी पाय मोडलेलीं व्यञ्जनें आहेत त्यांना इत् असें ह्मणतात. त्यांपैकीं एखादा इत् पुढें ठेवून, त्याच्या पूर्वीचा कोणत्याही सूत्रांतला वर्ण त्यासह उच्चारला असतां, तो प्रत्याहार त्या वर्णापासून पुढें धरलेल्या इतापर्यंतच्या सर्व वर्णांची संक्षिप्तसंज्ञा होतो. मात्र त्यावर्णांत पाय मोडके इत् धरावयाचे नाहींत, त्यांचा फक्त प्रत्याहार बांधण्यासच उपयोग होतो. जसें, उदाहरणार्थ 'उदात्तश्चानुदात्तश्च' ह्या शिक्षासूत्रांतील 'अच्' हाच प्रत्याहार घेऊं. 'अइउण्' सूत्रांतला अ हा 'ऐऔच्' ह्या सूत्रामधील चपर्यंतच्या सर्व वर्णांची संज्ञा होतो. ह्मणून अच् ह्मणजे अ इ उ ऋ ऌ ए ओ ऐ औ एवढे वर्ण समजावे; म्हणजे एकंदर सर्व स्वर आले. कारण विधेयरूप नसलेले अ इ उ ऋ ऌ वगैरे अण् प्रत्याहारांतले वर्ण आपापल्या जातींच्या दीर्घ वगैरे सर्व प्रकारांचेही संग्राहक असतात असें 'अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः'

ह्या सूत्रांत पाणिनीनें सांगितलें आहे. अच् प्रत्याहारांतल्या वर्णांनांच लोकांत स्वर ह्मणतात. परंतु ह्याशिवाय उदात्त, अनुदात्त व स्वरित ह्या अचांच्या विशेष धर्मांनांही स्वर हेंच नांव आहे आणि ह्याच दुसऱ्या अर्थानें तें नांव ह्या शास्त्रांत व वेदांत विशेष प्रसिद्ध आहे. कंठ, तालु वगैरे जीं वर्णांचीं स्थानें आहेत त्यांच्यांत खालचा भाग व वरचा भाग अशा दोन भागांची कल्पना केली आहे. त्यांपैकीं, वरच्या भागीं उच्चारिल्या जाणाऱ्या स्वराला उदात्त म्हणतात व त्यांतल्यात्यांत अधोभागीं उच्चारलेल्या स्वराला अनुदात्त म्हणतात. आणि उदात्तत्व व अनुदात्तत्व ह्या दोहोंनींही मिश्रित असलेल्या स्वराला स्वरित असें म्हणतात

त्यांत देखील स्वरिताचा पहिला अर्धा भाग उदात्त व शेवटचा दुसरा अर्धा भाग अनुदात्त असतो. हल्लीं हे स्वर ओळखण्याची साधारण खूण ह्मटली ह्मणजे वैदिक मंत्रांत ज्या अक्षरांना खालीं स्वर (आडवी रेघ) देतात ते अनुदात्त, ज्यांना वर स्वर ( उभी रेघ) देतात ते स्वरित व ज्यांना स्वर देत नाहींत ते उदात्त असतात. ह्याखेरीज प्रचय वगैरे मध्यें अनुदात्तांनाही स्वर देत नसतात. परंतु त्याचा सर्व उलगडा व्याकरण व प्रातिशाख्य वाचल्याशिवाय समजणार नाहीं. येथें फक्त दिग्दर्शन केलें आहे. असो, वैदिक वगैरे विद्वानांच्या पठनांतही, हे स्वर स्पष्ट समजून येतात. ऱ्हस्व, दीर्घ व प्लुत ह्याविषयीं विवरण, पूर्वींच पांचव्या श्लोकाच्या व्याख्यानाचे वेळीं केलें असून, तेथें आम्हीं मात्राकाल म्हणजे एक क्षण असें लिहिलें आहे. नारदीय शिक्षेंतही, ' निमेषकाला मात्रा स्याद्विद्युत्कालेति चापरे ' म्हणजे कोणी लोक पापणी मिटण्यास लागणारा वेळ तो मात्राकाल व कोणी दुसरे वीज चम-

कून मावळण्यास लागणारा वेळ तो मात्राकाल ह्मणतात, असें लिहून अत्यंत सूक्ष्म कालालाच एकमात्राकाल ह्मणावें असें सूचित केलें आहे. प्रत्येक ह्मणणाराचा सावकाशपणा व जलदी हीं सारखी नसल्यामुळें अमुकच मात्राकाल असें निश्चयात्मक ठरवितां येणार नाहीं, तथापि प्रत्येकाच्या ह्मणण्यांत ऱ्हस्वाच्या दुप्पट दीर्घोच्चाराला, व ऱ्हस्वाच्या तिप्पट प्लुत स्वरोच्चाराला काल दिला ह्मणजे सशास्त्र ह्मणणें होईल; व ज्याच्या ऱ्हस्वोच्चारास जो वेळ लागेल तोच त्याचा मात्राकाल असें मानतां येईल ॥ ११ ॥

**उदात्ते निषादगान्धारावनुदात्तऋषभधैवतौ ॥**
**स्वरितप्रभवा ह्येते षड्जमध्यमपञ्चमाः ॥ १२ ॥**

**अन्वयः** ॥ उदात्ते निषादगान्धारौ ( स्तः ) अनुदात्ते ऋषभधैवतौ ( स्तः ) षड्जमध्यमपञ्चमाः एते ( स्वराः ) स्वरितप्रभवाः हि ( सन्ति )

**अर्थ**—संगीत शास्त्रांत प्रसिद्ध असलेल्या सात सुरांपैकीं, निषाद व गांधार हे उदात्त स्वरांत येतात, ऋषभ व धैवत हे अनुदात्तांत येतात; आणि षड्ज, मध्यम व पञ्चम हे सूर स्वरित स्वरापासून उत्पन्न झालेले असतात. ही सप्तस्वरांची माहिती सामवेदाकरितांच विशेषतः आहे. ह्या प्रमाणें उदात्तादिस्वरांनीं, व ऱ्हस्वादिकालानीं, फक्त अच्संज्ञक ( स्वर ) वर्णांचा भेद होतो. ऋग्वेदांत व यजुर्वेदांत फक्त उदात्त, अनुदात्त व स्वरित हे तीनच स्वर प्रसिद्ध आहेत. सामवेदांत मात्र पांच किंवा सात स्वर आहेत. ॥ १२ ॥

**अष्टौ स्थानानि वर्णानामुरः कण्ठः शिरस्तथा ॥**
**जिह्वामूलं च दन्ताश्च नासिकौष्ठौ च तालु च ॥ १३ ॥**

**अन्वयः** ॥ वर्णानां स्थानानि, उरः, कण्ठः, शिरः, तथा जिह्वामूलंच, दन्ताश्च, नासिका, ओष्ठौच तालुच ( इति ) अष्टौ ( सन्ति ) ॥

**अर्थ**-आतां वर्णविभागाचें तिसरें कारण जें स्थान त्याचें वर्णन करितात. ऊर, कंठ, शिर, जिह्वामूल, दंत, नासिका, ओष्ठ आणि तालु ( टाळें ) हीं एकंदर आठ वर्णोत्पत्तीचीं स्थानें आहेत. ॥ १३ ॥

**ओभावश्च विवृत्तिश्च शषसा रेफ एव च ॥**
**जिह्वामूलमुपध्मा च गतिरष्टविधोष्मणः ॥ १४ ॥**

**अन्वयः** ॥ ओभावः विवृत्तिश्च शषसाश्च, रेफश्च, जिह्वामूलंच उपध्माच ( इति ) अष्टविधाएव ऊष्मणः ( विसर्गस्य ) गतिः ( अस्ति ) ॥

**अर्थ व विवरण**—पदांमध्यें असलेल्या विसर्गाला संहितमध्यें ( पदें जोडून ह्मणण्यांत ) निरनिराळे वर्ण पुढे असतां; ओकारत्व, स्वरान्तरत्व, श, ष, स, रेफ, जिह्वामूलीय आणि उपध्मानीय हे आठ विकार होऊ शकतात. हे आठ विकार समजण्याकरितां, पाणिनीय सूत्रें न देतां थोडक्यांत माहिती व उदाहरणें देतो, विसर्गामागें अकार असून त्याच्या पुढे अकार किंवा हश् प्रत्याहारांतला वर्ण आला असतां, त्या विसर्गाला मागच्या अकारासह ओत्व होतें, जसें=विश्वेदेवासः+असुरः=विश्वेदेवासोऽसुरः; ईड्यः+नूतनैः=ईड्यो नूतनैः. हा हश् प्रत्याहार व पुढेंही शिक्षेंत येणारे यण्, जश् वगैरे प्रत्याहार अकराव्या श्लोकावर लिहिलेल्या विवरणांवरून ओळखावे. विसर्गाच्या मागें अकार असून त्याच्या पुढें अकाराशिवाय कोणताही स्वर आला असतां, किंवा विसर्गामागें आकार असून त्यापुढें कोणताही स्वर आला असतां, त्या विसर्गाचा लोप होऊन मागच्या व पुढच्या स्वरांत अंतर राहतें, म्हणजे त्या दोन स्वरांचा संधि होत नाहीं; त्याला विवृत्ति म्हणतात. ‘स्वरान्तरं तु विवृत्तिः’

असें ऋग्वेदप्रातिशाख्याच्या प्रथमपटलांत शौनकमहर्षींनींही म्हटलें आहे. आतां ह्या विवृत्तीची उदाहरणें देतो=जसें, सः+इत्=सइत; सोमाः+अरंकृताः= सोमाअरंकृताः; ह्या विवृत्ति होत. विसर्गाच्या पुढेंच च, छ आले असता नित्य व श आला असतां विकल्पानें त्या विसर्गाला श होतो. ह्याचप्रमाणें ट ठ पुढें असतां नित्य व ष पुढें असतां विकल्पानें ( पाक्षिक ), त्याला ष् होतो; आणि त्या विसर्गापुढें त थ असतां नित्य व सकार पुढें असतां विकल्पानें त्याला स् होतो. उदाहरणें. इन्द्रः+च=इन्द्रश्च, चारुः+टीका=चारुष्टीका, यः+ते=यस्ते वगैरे. विसर्गाच्यामागें अआशिवाय कोणताही स्वर असून त्या पुढें, कोणताही स्वर किंवा हश्प्रत्याहारांतला वर्ण आला असतां, त्या विसर्गाला संहितेमध्ये रेफ होतो. जसें, ऋषिभिः+ईड्यः=ऋषिभिरीड्यः, अग्निः+होता= अग्निर्होता वगैरे. ह्या शिवाय स्वर, पुनर वगैरे मूळच्या रेफान्त शब्दांचे रेफ आणि ऋकरान्त शब्दांच्या संबोधनाच्या एक वचनांतले रेफही खर शिवाय कोणताही वर्ण पुढें आले असतां कायम राहतात. परंतु ते विसर्गजन्य नव्हेत हें ध्यानांत असावें. जसें, पुनर+भग=पुनर्भगः, भ्रातर+आगच्छ= भ्रातरागच्छ. क ख पुढें असतां जिह्वामूलीय व प फ पुढें आले आले असतां विकल्पानें उपध्मानीय होतो; हें मागें एकदां लिहिलेंच आहे. [ ५ व्या श्लोकावरील विवरण पहा. ] उदाहरणें नमः+कुलालेभ्यः=नम‍ᳵकुलालेभ्यः; अग्निः+पूर्वेभिः= अग्नि‍ᳶपूर्वेभिः. ह्या दोन दोन पदांतील विसर्गांचा उच्चार अर्धविसर्गासारखा होतो. ह्या आठ विकारांपैकीं कोणताही विकार झाला नसल्यास विसर्ग कायम राहतो. जसें, घना घनः क्षोभणः, नः स्वस्तये, अंगिरः वगैरे वगैरे. ॥ १४ ॥

**यद्योभावप्रसन्धानमकारादि परं पदम् ॥**
**स्वरान्तं तादृशं विद्याद्यदन्यद्व्यक्तमूष्मणः ॥ १५ ॥**

**अन्वय**—यदि परं पदम् अकारादि ( स्यात्तर्हि ) ओभावप्रसंधानं तादृशं स्वरान्तं विद्यात्, ऊष्मणः यद् अन्यत् [ तद् ] व्यक्तम् ( अस्ति ) ॥

**अर्थ**:—जर वरच्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें, विसर्गाला मागच्या अकारासह ओत्व झाले असून त्यापुढें अकारादिकच पद असेल तर तें मागचें ओकारांत पद तसेंच स्वरांत राहतें ह्मणजे त्याला अव् आदेश होत नाहीं, अथवा त्यापुढें असलेला अकार त्यामध्यें मिळून जात नाहीं. ह्यालाच व्याकरणशास्त्रांत प्रकृतिभाव ह्मणतात. ऋग्वेद प्रातिशाख्य पटल दुसरें ह्यांत शौनकाचार्यांनींही हेंच लिहिलें आहे. तें सूत्र असें, " उद्ग्राहाणांपूर्वरूपाण्यकारे प्रकृत्या द्व ओ भवत्येकमाद्यम्" ह्मणजे उद्ग्राहनामक संधींचीं जीं पूर्वावयवस्वरूपें; ऱ्हस्वाकारपूर्वक विसर्ग. एकार व ओकार ह्यांच्या पुढें अकार आला असतां, तीं दोन्हीं पदें प्रकृतीनें राहतात अर्थात् त्यांचा संधि होत नाहीं. ह्यापैकीं पहिलें रूप ह्मणजे ऱ्हस्वाकार पूर्वीं असलेला विसर्ग ह्याला विसर्ग व अकार ह्यांचें जागीं मिळून एक ओकार होतो. उदाहरणें. पुरोळाशं यो अस्मै, अध्वर्यो अद्रिभिः सुतम् वगैरे. आतां ह्या संध्यभावांचे पादोऽस्य वगैरे अपवादही तेथें सांगितले आहेत.ते ह्या शिक्षाशास्त्रांत दिले नाहींत. कारण " शिक्षाछन्दोव्याकरणैः सामान्यार्थाः समीरिताः ॥ तद्विशेषा व्यवस्थाच प्रातिशाख्येषु वर्णिता" ह्मणजे; शिक्षा, छंद व व्याकरण ह्या शास्त्रांनीं चारी वेदास व भाषेस उपयोगी असणारे सर्व सामान्य नियम मात्र आपापल्या विषयानुसार सांगितले आहेत; परंतु त्यांचे अपवादक विशेषनियम व व्यवस्थितपणा वगैरे

विषय, त्या त्या वेदशाखेच्या प्रातिशाख्यनामक स्वतंत्र शास्त्रांमध्यें सांगितलें असतात. असो, आतां 'यदन्यद्व्यक्तमूष्मणः' ह्या सूत्रांतल्या चवथ्या चरणाचा अर्थ लिहितो. पहिल्या तीन चरणांत ओत्वविषयक प्रकृतिभाव हा नवा विषय सांगितला. परंतु ह्याशिवाय इतर जे विवृत्ति, श, ष, स, वगैरे विसर्गाचे विकार ते, पाणिनीयशास्त्र वगैरेमध्यें प्रसिद्धच आहेत. आम्हीं मागें चवदाव्या श्लोकाच्या व्याख्यानांत त्या सर्व विकारांचें विवरण अष्टाध्यायीच्या अनुरोधानें स्पष्ट केलें आहे. ॥ १५ ॥

**हकारं पञ्चमैर्युक्तमन्तःस्थाभिश्च संयुतम् ॥**
**औरस्यं तं विजानीयात्कण्ठ्यमाहुरसंयुतम् ॥ १६ ॥**

**अन्वयः**—॥ पञ्चमैः युक्तम् अन्तःस्थाभिश्च संयुतं हकारं औरस्यं विजानीयात्; असंयुतं तं कण्ठ्यम् आहुः ॥

**अर्थ**.—तेराव्या श्लोकांमध्यें सर्व स्थानें सांगितलीं आहेत. आतां त्यांनीं होणारा वर्णांचा विभाग सांगण्यास प्रारंभ करितात. वर्गांमधले पंचम वर्ण म्हणजे ञ म ङ ण न; व अंतःस्थसंज्ञकवर्ण म्हणजे य व र ल ह्यापैकीं कोणत्याही वर्णाशीं संयुक्त असलेला हकार, हृदयस्थानांत उत्पन्न झालेला असतो असें जाणावें; व तो हकार कोणत्याही व्यञ्जनाशीं युक्त नसून मोकळा असला तर त्याला कंठस्थानोद्भव म्हणतात. अमुक वर्णाचें अमुक स्थान ह्याचा अर्थ त्या त्या वर्णाच्या उत्पत्तीच्या वेळीं त्या त्या निर्दिष्टस्थानाचा विशेष व्यापार अनुभवास येतो, असें समजावें. स्वतःच्या स्थानापेक्षां वेगळ्या स्थानीं उच्चरित झाल्यास वर्णोच्चार स्पष्ट व बरोबर होणार नाहीं. ॥ १६ ॥

**कण्ठ्यावहाविचुयशास्तालव्या ओष्ठजावुपू ॥**
**स्युर्मूर्धन्या ऋटुरषा दन्त्या लृतुलसाः स्मृताः ॥ १७ ॥**

**अन्वयः**- ॥ अहौ कण्ठ्यौ [ स्तः ], इचुयशाः तालव्याः ( सन्ति ) उपू ओष्ठजौ [ स्तः ], ऋटुरषाः मूर्धन्याः स्युः लृतुलसाः दन्त्याः स्मृताः [ सन्ति ] ॥

**अर्थ व विवरणः**—अवर्ण व हकार ( अर्थात् असंयुक्त ) हे कण्ठ-स्थानोत्पन्न; इवर्ण, चवर्ग ह्मणजे च छ ज झ ञ, य आणि श हे तालु-स्थानोत्पन्न, उवर्ण आणि पवर्ग ह्मणजे प फ ब भ म हे ओष्ठस्थानोत्पन्न; ऋ, टवर्ग ह्मणजे ट ठ ड ढ ण, र आणि ष हे मूर्धा एतन्नामकस्थानांत उत्पन्न झालेले; व लृवर्ण, तवर्ग ह्मणजे त थ द ध न, ल आणि स दन्तस्थानोत्पन्न सांगितले आहेत. व्याख्यानपद्धतीचें विवरण. ज्या व्यञ्जनोपुढें उकार इत् लावला असेल तें व्यंजन आपल्या सर्व सवर्णांचे ह्मणजे संपूर्ण वर्गाचे ग्राहक होतें, असें 'अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः' ह्या सूत्रानें अष्टाध्यायींत पाणिनिमहर्षीनें सांगितले आहे; म्हणून शिक्षेंतील चु पु वगैरे पदांचा अर्थ चवर्ग पवर्ग असा करतां आला. ओष्ठस्थान म्हणजे दोन्हीं ओंठ, म्हणून ओष्ठ्य वर्णांच्या उच्चाराचे वेळीं दोन्हीं ओंठांचा परस्परास स्पर्श होतो. दंत-स्थान म्हणजे वरच्या दातांचा मूलप्रदेश, तालु ( टाळें ) म्हणजे दंतमूलाच्या मागचा उंचवटा, व मूर्धास्थान म्हणजे तालुस्थानाच्या किंचित् मागें असलेला गुळगुळीत प्रदेश होय. दन्त्य, तालव्य व मूर्धन्य ह्या वर्णांचा उच्चार करतानां क्रमानें त्या त्या स्थानास जिभेच्या शेंड्याचा स्पर्श करावा लागतो. ॥ १७ ॥

**जिह्वामूले तु कुः प्रोक्तो दन्त्योष्ठ्यो वः स्मृतो बुधैः ॥**
**एऐतु कण्ठतालव्या ओऔ कण्ठोष्ठजौ स्मृतौ ॥ १८ ॥**

**अन्वयः**—॥ बुधैः कुस्तु जिह्वामूले ( भवन् ) प्रोक्तः ( अस्ति ) वः दन्त्योष्ठ्यः स्मृतः, ए ऐ तु कण्ठतालव्यौ (स्मृतौ स्तः) ओ औ ( च ) कण्ठोष्ठजौ स्मृतौ ( स्तः ) ॥

**अर्थः**—जिभेच्या मूळामध्यें कवर्ग ह्मणजे क ख ग घ ङ उत्पन्न होतात असें सांगितलें आहे. वकार, दांत व ओठ ह्या दोन स्थानांत मिळून उत्पन्न होतो असें विद्वान् ह्मणतात. ए आणि ऐ हे कण्ठ व तालु ह्या दोन स्थानांत मिळून उत्पन्न होतात, व ओ औ हे, कंठ आणि ओष्ठ ह्या दोन स्थानांत उत्पन्न होतात असें ह्मटलें आहे. ए ओ ऐ औ ही चार संध्यक्षरें आहेत, ह्मणजे दोन दोन स्वर एकत्र मिळून झालेलीं आहेत. ह्मणून त्यांची उत्पत्ति दोन दोन स्थानांत मिळून होते. ॥ १८ ॥

**अर्धमात्रा तु कण्ठ्या स्यादेकारैकारयोर्भवेत् ॥**
**ओकारौकारयोर्मात्रा तयोर्विवृतसंवृतम् ॥ १९ ॥**

**अन्वयः**--॥ एकारैकारयोः तु अर्धमात्रा कण्ठ्या स्यात्, ओकारौकारयोः मात्रा ( कण्ठ्या ) भवेत्, तयोः विवृतसंवृतम् ( अस्ति ) ॥

**अर्थ व विवरणः**—वरच्या श्लोकांत ए ऐ ओ औ ह्या संध्यक्षरांचीं स्थानें सांगितलीं. त्यांचे अवयव अनुक्रमें; अ+इ, अ+ए, अ+उ, अ+ओ असे आहेत; म्हणून त्यांमधील दोन दोन स्थानांची मात्राविभागानें वाटणी सांगतात. एकार व ऐकार ह्यांच्यामध्यें, पहिली अर्धी मात्रा कण्ठस्थानची आहे ह्मणजे अकारांश आहे, व इतर दीड मात्रा तालुस्थानची आहे. प्लुत ए, ऐ असल्यास अडीच मात्रा तालुस्थानच्या होतील. कारण तो त्रिमात्र असतो. ओकार

व औकार ह्यांच्यामध्यें तर पहिली एक मात्रा कण्ठ्य ह्मणजे अकारांश असून त्या पुढचा इतर भाग (एक मात्रा अथवा फुनांत दोन मात्रा) तालुस्थानचा आहे. ह्या अर्धमात्रेच्या व एकामात्रेच्या अंशांमध्यें, विवार व संवार हे बाह्यप्रयत्न (अनुप्रदान) किंवा ह्यांनीं युक्त असलेले आदेश व्यवस्थित आहेत. विवरण—यथासंख्य सूत्रावरच्या भाष्यांत 'एचोऽयवायावः' हया सूत्रासंबंधीं लिहितांना महाभाष्यकार पतञ्जलि, 'संवृतावर्णस्य संवृतावर्णः विवृतावर्णस्य विवृतावर्णः' असें लिहितात. हयाचें तात्पर्य असें कीं, एच् प्रत्याहारांतल्या वर्णांना स्वर पुढें आला असतां; अय्, अव्, आय्, आव् असे आदेश क्रमानें होतात, परंतु त्याच्याकरितां 'यथासंख्यमनुदेशः समानाम्' हें सूत्र नको. कारण एचांमधील संवृतावर्णयुक्त एओनां स्वर पुढें आला असतां संवृत अवर्णानें युक्त असलेले म्हणजे ह्रस्वाकारयुक्त अय् अव् हे आदेश, आणि विवृतावर्णयुक्त असलेल्या ऐ औ ह्यांना, विवृतावर्णानें ह्मणजे आकारानें युक्त आय् आव् हे आदेश 'स्थानेऽन्तरतमः' हया सूत्रानेंच होतील. हया भाष्याच्या प्रमाणावरून एकार व ओकार हयांतील अकारांश संवृत ठरतो व ऐ औ हयांमधील फक्त अकारांश विवृत ठरतो. कारण 'ताभ्यामैचौ तथैवच' हया, पुढें येणाऱ्या शिक्षासूत्रावरून ऐ औ हे एकंदरीनें विवृततम आहेत. असो, एकंदरींत अकारांशभूत मात्रामध्यें विवार संवार हे प्रयत्न व्यवस्थित आहेत हें सिद्ध झालें, विवार प्रयत्न म्हणजे कंठाचा अधिक विकास व संवार ह्मणजे त्या गलबिलाचा किंचित् संकोच होय, वर दिलेला भाष्यांश वगैरे विषय 'एचोयवायावः' हया सूत्रावरच्या शब्देन्दुशेखरांत नागोजीभट्टांनीं दिला आहे. ॥ १९ ॥

**सन्वृंत मात्रिकं ज्ञेयं विवृतं तु द्विमात्रिकम् ॥**
**घोषा वा संवृताः सर्वे अघोषा विवृताः स्मृताः ॥ २० ॥**

**अन्वयः**—संवृतं मात्रिकं ज्ञेयं, विवृतं तु द्विमात्रिकम् [ अस्ति ] सर्वे घोषाः संवृताः वा ( सन्ति ) अघोषाः विवृताः स्मृताः [ सन्ति ] ॥

**अर्थः**—सहज प्रसंग आला आहे ह्मणून, विवार व संवार हे बाह्य-प्रयत्न असूनही ह्या स्थानप्रकरणांत त्यांचे विशेष वर्णन करितातः वर संवृतावर्णस्य संवृतावर्णः ' ' विवृतावर्णस्य विवृतावर्णः ' हें भाष्य दिलें आहे. ह्यांतील ए ओ ह्यांना आदेश होणारा संवृतावर्ण एक मात्रिक अर्थात् ऱ्हस्व होतो असें जाणावें; ऐ औ ह्यानां आदेश होणारा विवृतावर्ण द्विमात्रिक म्हणजे दीर्घ होतो असें समजावें. ह्यांचें वर्णन मागें एकोणिसाव्या श्लोकावर लिहितांना केलेंच आहे. ह्या बाह्य प्रयत्नानां विवारकरण व संवारकरण अशींही निराळीं नांवें आहेत. घोष-प्रयत्नानें युक्त असलेले सर्व वर्ण विवृत म्हणजे विवारप्रयत्नानें युक्त आहेत. शिक्षेंत पुढें एकोणचाळिसाव्या श्लोकांत घोष हे बाह्य प्रयत्न न सांगतां, त्या ऐवजीं नाद प्रयत्नच सांगितले आहेत. ह्याकरितां पाणिनीय शास्त्राच्या अनुसारानें तेथें जे नादयुक्त सांगितले आहेत तेच येथें घोष अथवा नाद ह्याचाच अर्थ घोष धरावा. त्यावरून ह झ भ घ ढ ध य व र ल ज ब ग ड द आणि ह्यांपैकीं वर्गतृतीय व वर्गचतुर्थ यांचे यम हे घोष आहेत; आणि ख फ छ ठ थ च ट त क प, ह्यांचे यम, श ष स, विसर्ग, जिह्वा-मूलीय, व उपध्मानीय हे अघोष ठरतात. ' अन्त्याः सप्त तेषाम् ( ऊष्मणाम्) अघोषाः ' ' वर्ग वर्गेच प्रथमावघोषौ' ह्या दोन सूत्रांनीं ऋग्वेद—प्रातिशा-

ह्यांतही हेच अघोष सांगितले आहेत, मात्र त्यांत अनुस्वार जास्ती आहे. ॥२०॥

**स्वराणामूष्मणां चैव विवृतं करणं स्मृतम् ॥**

**तेभ्योऽपि विवृतावेङौ ताभ्यामैचौ तथैव च ॥ २१ ॥**

**अन्वयः** ॥ स्वराणाम् ऊष्मणां च विवृतम् एव करणं स्मृतम् ( अस्ति ) एङौ तेभ्यः अपि विवृतौ ( स्तः ) ऐचौ च ताभ्याम् तथैव च ( स्तः ) ॥

**अर्थः**—अ इ उ ऋ ऌ हे स्वर. आणि ऊष्मे ह्मणजे श ष स ह ह्यांचा विवार हा बाह्य प्रयत्न आहे व त्यांच्या पेक्षां ए ओ हे जास्त विवृत आहेत, ह्मणजे विवृततर आहेत. आणि एङाहूनही ( ए ओ ), ऐच् ( ऐ औ ) हे जास्त विवृत म्हणजे विवृततम आहेत. ह्याशिवाय दीर्घ आकार सर्वांपेक्षां जास्त विवृत आहे असे दुसरीकडे ग्रंथान्तरांत सांगितलें आहें. ह्या वर्णनाप्रमाणेंच वर्णोच्चारण करतानां, कंठविकासादिकांवरून अनुभवही येतो. ह्या व पुढच्या श्लोकांमधून येणारे ऐच् एङ् हल् वगैरे प्रत्याहार पूर्वीं लिहिल्याप्रमाणें 'अइउण्' वगैरे चौदा सूत्रांवरून ओळखावे ( श्लोक ११, विवरण पहा ). आम्हीं ह्या पुढें, विवरणांत फक्त प्रत्याहारांचे स्पष्ट वर्ण मात्र लिहूं. हें मागें सांगितलेंच आहे, तथापि व्याख्यानाची रीति समजण्याकरितां येथें पुन्हां एकवार सुचविलें आहे. ॥ २१ ॥

**अनुस्वारयमानाञ्च नासिकास्थानमुच्यते ॥**

**अयोगवाहा विज्ञेया आश्रयस्थानभागिनः ॥ २२ ॥**

**अन्वयः**—अनुस्वारयमानां स्थानं नासिका उच्यते, अयोगवाहाः आश्रयस्थानभागिनश्च विज्ञेयाः ॥

**अर्थ**-आतां निवार वगैरेंचा प्रासंगिक विचार संपवून पुन्हां सूत्रकार स्थानविभागाकडे वळतात. अनुस्वार आणि चवथ्या श्लोकांत सांगितलेले चार जातींचे यम, ह्यांचें नासिका स्थान आहे. ह्मणजे ह्यांच्या उत्पत्तीस नासिका स्थान कारण आहे, अर्थात् ह्यांच्या ध्वनींचा आघात नाकांत होत असतो. ह्याशिवाय अनुस्वार, विसर्ग, जिह्वामूलीय, उपध्मानीय व यम, हे अयोग-वाह वर्ण आपापल्या शेजारी असलेल्या आश्रयभूत वर्णांच्या स्थानानेंही युक्त असतात; ह्मणजे ह्यानां दोन दोन स्थानें आहेत. ह्यापैकी अनुस्वार व विसर्ग ह्यांचा आश्रय त्यांच्या मागचा स्वर असतो, व इतर तिघांचा आश्रय त्यांच्या पुढचा वर्ण असतो, योग ह्मणजे संधि ( संयोग ). हे वर्ण इतर वर्णाशीं संयोग पावत नाहींत ह्मणून त्यानां अयोगवाह ह्मणतात ॥ २२ ॥

**अलाबुवीणानिर्घोषो दन्त्यमूल्यः स्वराननु ॥**
**अनुस्वारस्तु कर्तव्यो नित्यं ह्रोः शषसेषुच ॥ २३ ॥**

**अन्वयः**॥ अनुस्वारस्तु ह्रोः शषसेषु च ( परेषु सत्सु ) नित्यं अलाबु-वीणानिर्घोषः दन्त्यमूल्यः स्वरान् अनु (—सृतः) च कर्तव्यः ॥

**अर्थः**—अनुस्वाराचा उच्चार; हकार, रेफ, श, ष, आणि स पुढें असतां नेहमीं भोपळा लावलेल्या वीणेसारखा ध्वनि असणारा, दंतमूलस्थानांत उत्पन्न झालेला, व मागच्या स्वरांस चिकटून असलेला ह्मणजे त्यांच्या स्थानां-चाहि अनुभव घेणारा ( हें वर लिहिलेंच आहे ) असा करावा. ह्याचप्रमाणें नारदीय शिक्षेंतही सांगितलें आहे. तें वाक्य असें. “ आपद्यते मकारो रेफो-ष्मसु प्रत्ययेष्वनुस्वारम् । यवलेषु परसवर्णं स्पर्शेष्वथ चोत्तमापत्तिम् ॥ ” ह्मणजे र श ष स ह हे वर्ण पुढें असतां, मला अनुस्वार होतो; य व ल पुढें असतां

त्याला परांचे सवर्ण ह्मणजे अनुनासिक यँ वँ लँ होतात; व स्पर्श ह्मणजे इतर व्यञ्जनें मकारापुढें असतां, त्याला त्यांच्या त्यांच्या वर्गांतलें शेवटचें अनुनासिक व्यञ्जन ह्मणजे ङ् ञ् वगैरे होतें. ॥ २३ ॥

**अनुस्वारे विवृत्यां तु विरामे चाक्षरद्वये ॥**
**द्विरोष्ठौ तु विगृह्णीयाद्यथौकारवकारयोः ॥ २४॥**

**अन्वयः** ॥ यथा तु ओकारवकारयोः ( तथा ) अनुस्वारे विवृत्यां तु विरामे अक्षरद्वयेच्च ओष्ठौ द्विः विगृह्णीयात् ॥

**अर्थ**–परंतु ' तद्वो दिवः ' वगैरे उदाहरणांत ओकार आणि वकार ह्यांच्या स्पष्ट उच्चाराची जशी रीत आहे; त्याचप्रमाणें,त्या पूर्वोक्त अनुस्वाराचा उच्चार करतानां, स्वरांचें अंतर ह्मणजे संधीचा अभाव (प्रकृतिभाव) दाखवायचा असतां, पदच्छेद करतानां, दोन निरनिराळे शब्द उच्चारतांना, जसा ओकारवकारांसारखे समानस्थानाचे वर्ण लागोपाठ उच्चारावयाचे असतां, ओठांचा निरनिराळा दोनदां स्पष्ट व्यापार (हालचाल) करावा लागतो तसा करावा. ह्मणजे त्या अनुस्वार वगैरेंचे त्यांच्या शेजाऱ्याशीं मिश्रण होऊं देऊं नये तर, दोघांचें निरनिराळें श्रवण झालें पाहिजे. उदाहरणें अनुक्रमानें देतों. जसे. त्वं हि, बुध इच्छंति, सहस्रपात् ।। सभूंमिम्, मत्सरः, त्वोतः वगैरे ॥ २४ ॥

**व्याघ्री यथा हरेत्पुत्रान्दंष्ट्राभ्यां नच पीडयेत् ॥**
**भीता पतनभेदाभ्यां तद्वद्वर्णान्प्रयोजयेत् ॥ २५ ॥**

**अन्वयः**–॥ यथा व्याघ्री पतनभेदाभ्यां भीता ( सती ) दंष्ट्राभ्यां पुत्रान् हरेत् नच पाडियेत्, तद्वत् वर्णान् प्रयोजयेत् ॥

**अर्थः**—ज्या प्रमाणें एखादी वाघीण आपली पोरें एका स्थळापासून दुसरीकडे नेत असतां, कदाचित् हीं निसटून पडतील किंवा ह्यांची अंगें फाटतील ह्या दोन्हीं गोष्टीनां भिऊन त्यानां दातांनीं अलगज धरून जपून नेते; त्यांच्या अंगांत दाढा टोंचीत नाहीं व त्यानां सैलही सोडीत नाहीं. त्याचप्रमाणें बोलणारानें व विशेषतः वेद पढणारानें, वर्णांचा प्रयोग करावा; ह्मणजे त्यांचा उच्चार अगदीं मिळमिळीतही उपयोगी नाहीं, व त्या वर्णांचा दाबून उच्चारही उपयोगी नाही, ह्याप्रींचा प्रकार मांजरी आपली पोरें दुसरीकडे उचलून नेत असतां, नेहमीं अनुभवास येतो. ॥ २५ ॥

**यथा सौराष्ट्रिका नारी तक्रँ इत्यभिभाषते ॥**
**एवं रङ्गाः प्रयोक्तव्याः खेअराँ इव खेदय ॥ २६ ॥**

**अन्वयः** ॥ सौराष्ट्रिका नारी यथा तक्रँ इति अभिभाषते एवं रङ्गाः प्रयोक्तव्याः ( यथा ) खे अराँ इव खेदय ॥

**अर्थ**—ज्याप्रमाणें, सुराष्ट्र—[ सुरत, काठेवाड ] देशांतली स्त्री 'तक्रँ' हा शब्द उच्चारतानां, त्याच्या शेवटीं अनुनासिकाचा उच्चार करते; त्याचप्रमाणें आपणही वेद वगैरे ग्रन्थामध्यें येणाऱ्या अनुनासिकांचा [ रंग ] उच्चार करीत जावा. ह्याला ऋक्संहितेंतील उदाहरण 'खे अराँ इव खेदय' ह्यांतील अनुनासिकाचा उच्चार आहे. हल्लीं देखील गुजरी किंवा कोंकणी बायकांच्या उच्चारांत अनुनासिक विशेष स्पष्ट ऐकूं येतात. त्याप्रमाणें स्वराचें अनुनासिकत्व ह्मणजे नाकांतला उच्चार व्यक्त करावा. अनुस्वार व अनुनासिक दोन्हीं अगदीं वेगळेवेगळे आहेत हें ध्यानांत ठेवावें. कारण अनुस्वार हा एक वेगळा वर्ण मागें गणिलेला असून, अनुनासिकत्व हा एक फक्त स्वरांचा

विशेष धर्म आहे. वर आलेला अनुनासिकोच्चार, स्वर पुढें असतांना होतो असें जाणावें, ह्यालाच वैदिकी भाषेंत रंग अशी संज्ञा आहे. यजुर्वेदांत अनुभवास येणारा, ऊष्मवर्ण [ शषसह ] पुढें असतां होणारा अनुनासिकाचा उच्चार, गँ ह्याच्या उचाराप्रमाणें करतात. जसें. मा हिंसीः, परूंषिचमे, त्वँहि वगैरे. ॥ २६ ॥

**रङ्गवर्णं प्रयुञ्जीरन्नोग्रसेत्पूर्वमक्षरम् ॥**
**दीर्घस्वरं प्रयुञ्जीयात्पश्चान्नासिक्यमाचरेत्**

**अन्वयः** ॥ रङ्गवर्णं प्रयुञ्जीरन् ( पाठकः ) पूर्वम् अक्षरं नोग्रसेत्, ( आदौ ) दीर्घस्वरं प्रयुञ्जीयात्पश्चान्नासिक्यम् आचरेत् ॥

**अर्थ**—वरच्या श्लोकांत सांगितलेल्या रंगाचे संबंधीं वर्ण उच्चारतांना रंगाच्या पूर्वीच्या अक्षराचा ग्रास करूं नये. ‘ जिह्वामूलनिग्रहेग्रस्तमेतत् ’ ह्या ऋक्प्रातिशाख्याच्या चवदाव्या पटलांतल्या सूत्रांवरून पाहतां, ग्रास म्हणजे जिह्वामूलाचें स्तंभन ( तटस्थपणा ) होय. हा ग्रास दोष अ आमध्यें संभवतो म्हणून ‘खेअराँ इव’ वगैरे स्थलीं पूर्व स्वरांचा उच्चार त्यांच्या त्यांच्या स्थानानें स्पष्ट करावा लागतो; म्हणून प्रथम स्पष्टपणें दीर्घस्वर उच्चारावा व त्यानंतर अनुनासिकत्वाचा उच्चार करावा. ॥ २७ ॥

**हृदये चैकमात्रोऽस्यास्त्वर्धमात्रस्तु मूर्धनि ॥**
**नासिकायां तथार्धञ्च रङ्गस्यैवं द्विमात्रता ॥ २८ ॥**

**अन्वयः**—अस्य एकमात्रश्च हृदये अस्तु अर्धमात्रस्तु मूर्धनि ( अस्तु ) तथा अर्धंच नासिकायाम् [ अस्तु ] एवं रङ्गस्य द्विमात्रता ( अस्ति )

**अर्थः**—सूत्रकार पुन्हां त्या रंगाचेच अधिक वर्णन करतात. रंगाचा उच्चार,

हृदयस्थानांत पहिली एकमात्रा मूर्धस्थानांत त्या पुढची अर्धमात्रा,व नासिकेमध्यें शेवटची अर्धमात्रा ह्या प्रमाणें होतो ह्मणजे एकंदर रंगाच्या उच्चाराला दोन मात्रा काल लागतो. ॥ २८ ॥

**हृदयादुत्करे तिष्ठन्कांस्येन समनुस्वरन् ॥**
**मार्दवं च द्विमात्रं च जघन्वाँ इति निदर्शनम् ॥ २९ ॥**

**अन्वयः**—॥ ( सः ) हृदयात् उत्करे तिष्ठन् मार्दवं च द्विमात्रं च कांस्येन समनुस्वरन् [ अस्ति ] जघन्वाँ इति निदर्शनम् ( अस्ति ॥

**अर्थः**—तो रंग, [ दीर्घानुनासिक ] हृदयस्थानांत उत्पन्न होऊन मूर्ध-स्थानीं येणारा, व कांशाच्या नादाप्रमाणेंच परंतु मृदु असा ध्वनि नासिकेंत उमटविणारा असून द्विमात्र असतो. ह्याला जघन्वाँ हें उदाहरण आहे. मागें पांचव्या श्लोकावर उल्लेख केलेला औदव्रजीच्या मतानें असलेला दीर्घानुस्वारच, कदाचित् ह्या दीर्घानुनासिकाच्या स्थानीं धरिला जात असल असे वाटतें. ॥ २९ ॥

**मध्ये तु कम्पयेत्कम्पमुभौ पार्श्वौ समौ भवेत् ॥**
**सरङ्गं कम्पयेत्कम्पं रथीवेति निदर्शनम् ॥ ३० ॥**

**अन्वयः** ॥ कम्पं तु मध्ये कम्पयेत् ( सः ) समौ उभौ पार्श्वौ भवेत्, ( एवं ) सरङ्गं कम्पं कम्पयेत्, रथी ३ रिव इति निदर्शनम् ( अस्ति ) ॥

**अर्थ**—आतां रंगविशेषाची माहिती देणार आहेत त्याकरितां, प्रथम कंप ह्मणजे काय हें सांगून नंतर मूलार्थ लिहितो. ज्याच्यापुढें उदात्त किंवा स्वरित स्वर आहे अशा स्वरित स्वराला वैदिकी भाषेत कंप म्हणतात, कारण

त्या एकाच स्वराच्या उच्चारांत खालींवर मान कांपवावी लागते. हे कंप ऱ्हस्व, दीर्घ व प्लुत ह्या भेदांनीं तीन प्रकारचे आहेत. उदाहरणें. क १ वोऽश्वाः, रथानां न येऽ २ राः, वरूथं तन्वे ३ मम वगैरे, आतां सूत्रार्थाकडे वळतो. इतक्यांतच वर सांगितलेला हा कंपच रंगयुक्त असेल तर, कंपाचा उच्चार ह्मणजे शिराच्या खालीं वर आंदोलनासहित ह्मणणें, हें मध्यें करावें, व त्याच्या मागें आणि पुढें रंगाचा ( अनुनासिक ) उच्चार अर्धा अर्धा सारखा असतो, ह्या प्रमाणें सरंग कंपाचा उच्चार करावा. ह्याला रथी' २ रिव हें उदाहरण आहे. ॥ ३० ॥

**एवं वर्णाः प्रयोक्तव्या नाव्यक्ता नच पीडिताः ॥**
**सम्यग्वर्णप्रयोगेण ब्रह्मलोके महीयते ॥ ३१ ॥**

**अन्वयः** ॥ एवं वर्णाः प्रयोक्तव्याः अव्यक्ताः न ( प्रयोक्तव्याः ) पीडिताश्च न ( प्रयोक्तव्याः ), ( हि द्विजः ) सम्यक् वर्णप्रयोगेण ब्रह्मलोके महीयते ॥

**अर्थ**=मागें स्थानें व करणें ( विवार संवार ) सांगितलीं आहेत. त्याप्रमाणें यथायोग्य त्या त्या स्थानांचा आश्रय करून वर्णांचा प्रयोग करीत जावा. ते वर्ण अस्पष्ट उच्चारूं नये व त्यांचें दाबून दोनदां उच्चारणहि करूं नये. कारण वेदपाठक ब्राह्मणानें उत्तमप्रकारें वेदवर्णांचा उच्चार केला असतां, तो पुढें ब्रह्मलोकांत जाऊन पूजा पावतो ह्मणजे मोठ्या योग्यतेंत राहतो. ॥३१॥

**गीती शीघ्री शिरःकम्पी तथा लिखितपाठकः ॥**
**अनर्थज्ञोऽल्पकण्ठश्च षडेते पाठकाधमाः ॥ ३२ ॥**

**अन्वयः** ॥ गीती, शीघ्री, शिरःकम्पी, तथा लिखितपाठकः, अनर्थज्ञः अल्पकण्ठश्च एते षट् पाठकाधमाः ( सान्ति ) ॥

**अर्थ**=आतां वेदपठन करणाराचे दोष काय आहेत ते, टाळतां येण्याकरितां; ह्या श्लोकानें सांगतात. गाण्याच्या सुरानें म्हणणारा घाई करणारा, उगीच डोकें हलविणारा, तसाच लिहिलेलें वाचणारा, म्हणजे तोंडपाठ न येणारा, काय म्हणावयाचें असेल त्याचा अर्थ व स्वरूप न जाणणारा, आणि अगदींच कोता ( लहान ) आवाज असणारा; हे सहा पाठक, वेद ह्मणणारामध्यें अधम ह्मणजे हलक्या प्रतीचे मानिले आहेत. ॥ ३२ ॥

**माधुर्यमक्षरव्यक्तिः पदच्छेदस्तु सुस्वरः ॥**
**धैर्यं लयसमर्थं च षडेते पाठका गुणाः ॥ ३३ ॥**

**अन्वयः**—(भोः) पाठकाः माधुर्यम्, अक्षरव्यक्तिः, पदच्छेदः, सुस्वरः, धैर्यम्, लयसमर्थंच ( पठनम् ), एते षट्तु गुणाः (सन्ति) ॥

**अर्थः**—आणि हे वेद पठन करणारानो! ह्मणण्यांत गोडी, वर्णांचा स्पष्टपणा, पदांचा छेद ह्मणजे वेगवेगळेपणा स्पष्ट करून येणें, स्वरांचा उत्तम उच्चार, गंभीरपणा, आणि इतरांच्या ह्मणण्यांत लय होण्याची समर्थता ह्मणजे मिळून जाणें; अथवा एकटाच ह्मणणारा असल्यास मागल्या व पुढल्या मंत्रोच्चारांत सारखेपणा;हे सहा वेद पठनाचे चांगले गुण मानिले आहेत. ॥३३॥

**शङ्कितं भीतमुद्घृष्टमव्यक्तमनुनासिकम् ॥**
**काकस्वरं शिरसिगतं तथा स्थानविवर्जितम् ॥ ३४ ॥**
**उपांशुदष्टं त्वरितं निरस्तं विलंबितं गद्गदितं प्रगीतम् ॥**
**निष्पीडितं ग्रस्तपदाक्षरं वा वदेन्नदीनं नतु सानुनास्यम् ॥३५**

**अन्वयः** ॥ [ पाठकः ] शङ्कितम्, भीतम्, उद्घृष्टम्, अव्यक्तम्, अनुनासिकम् काकस्वरम्, शिरसिगतम्, तथा स्थानविवर्जितम्, उपांशु, दष्टम्,

त्वरितम्, निरस्तम्, विलम्बितम्, गद्गदितम्, प्रगीतम्, निष्पीडितम्, ग्रस्तपदाक्षरम्, दीनं वा न वदेत्; सानुनास्यं तु न ( वदेत् ) ॥

**अर्थ**—तसेंच आणखी वेदपाठकानें; शंकायुक्त असलेलें, भीतभीत ह्मटलेलें, अत्यंत दाबून ह्मटलेलें, अस्पष्ट, नाकांत उच्चारलेलें, कावळयाच्या स्वरासारखे कर्कश, डोकें दुखूं लागेल इतक्या उंच स्वरानें युक्त, भलत्याच स्थानीं ह्मटलेलें, अत्यंत हळू ह्मटलेलें, हनुवटी लांबवून म्हटलेलें [ दष्ट ], फार घाईचें, यथायोग्य कंठादिस्थानें व विवार संवार ( करणें ) ह्यांना सोडून असलेलें, अत्यंतच सावकाश, सद्गदित स्वराचें, गाण्याच्या सुरावर असलेलें, वारंवार तोच तोच वर्ण पुन्हां पुन्हां उच्चारलेलें [ निष्पीडित, तोतरें. ] मधली मधलीं पदें व अक्षरें सोडलेलें ( अक्षरें गिळलेलें ), दीनवाणी, आणि जेथें नसेल तेथेंही अनुनासिक स्वरांनी युक्त, अशाप्रकारचें वेदपठन कधींही करू नये. कारण ह्या चौतिसाव्या व पस्तिसाव्या श्लोकांत सांगितलेले हे एकोणीस प्रकार बोलण्याचे व वेदादिपठनाचे दोष मानिले आहेत. आह्मी वर दष्ट, निरस्त आणि निष्पीडित ह्या तीन पदांचा अर्थ; क्रमानें ‘ संदष्टं तु व्रीडने आह हन्वोः ’ निरस्तं स्थानकरणापकर्षे’ ह्या ऋक्प्रातिशाख्यांतल्या चतुर्दशपटलस्थ सूत्रांच्या व ‘ पीडनं द्विर्मात्रः ’ ह्या त्यावरील उवटाचार्यांच्या भाष्यांतील वाक्याच्या आधारानें केला आहे. कारण कीं, हे शिक्षाशास्त्रांतले पारिभाषिक शब्द असल्यानें, लोकप्रसिद्धीनें किंवा केवळ व्युत्पत्तीनें ह्यांचा अर्थ निश्चित होऊन जुळण्यासारखा नाहीं. बाकी राहिलेलीं शंकितम् भीतम् वगैरे पदें बरींच प्रसिद्ध आहेत. ह्या दोन श्लोकांवरून पठनाचे दोष समजून

येईल. ते टाळून मागें सांगितल्याप्रमाणें माधुर्यादिक गुणानीं युक्त असेंच वेदपठन करीत जावें. पहिल्याच्या श्लोकाचें वृत्त उपजाति आहे. कारण त्यांत इन्द्रवज्रा व उपेन्द्रवज्रा ह्यांच्या चरणांचें मिश्रण आहे. ॥ ३४ । ३५॥

**प्रातः पठेन्नित्यमुरःस्थितेन स्वरेण शार्दूलरुतोपमेन ॥**
**मध्यंदिने कण्ठगतेन चैव चक्राह्वसंकूजितसंनिभेन ॥ ३६ ॥**

**अन्वयः** ॥ प्रातः नित्यम् उरःस्थितेन शार्दूलरुतोपमेन स्वरेण पठेत् मध्यंदिने च चक्राह्वसंकूजितसन्निभेन कण्ठगतेन एवं ( स्वरेण ) पठेत् ॥

**अर्थः**--प्रातःकाळीं नेहमीं, हृदयस्थानांत उत्पन्न होणाऱ्या व वाघाऱ्या साहजिक गुरगुरण्यासारखा असणाऱ्या स्वरानें, ह्मणजे अल्प आवाजानें वेदादिकांचे पठन करावें. कारण कीं, हा प्रातःसवनाची वेळ असून स्वराला प्रथमच चालन द्यावयाचें असतें म्हणून, प्रथम लहान आवाजांतच म्हणावें म्हणजे पुढें चढतां चढतां चढेल, एकदम मोठा स्वर सुरू केल्यास तो जुळणार नाहीं व पुढच्या सवनांच्या वेळीं अत्यंत त्रास होऊनही नीट म्हणतां येणार नाहीं. असो, मध्याह्नकाळीं दुसऱ्या सवनाच्या वेळेस, कंठात उत्पन्न होणाऱ्या व चक्रवाक पक्ष्याच्या शब्दासारखा असणाऱ्या स्वरानें म्हणजे तेवढ्या मोठ्या आवाजानें पठन करीत जावें. कारण त्या माध्यंदिन सवनाला असाच मध्यम आवाज असावा लागतो ॥ ३६ ॥

**तारं तु विद्यात्सवनं तृतीयं शिरोगतं तच्च सदा प्रयोज्यम् ॥**
**मयूरहंसाम्बुभृतस्वराणां तुल्येन नादेन शिरःस्थितेन ॥३७॥**

**अन्वयः** ॥ तृतीयं सवनं तु तारं शिरोगतं ( च ) विद्यात् तच्च सदा मयूरहंसाम्बुभृतस्वराणां तुल्येन शिरःस्थितेन नादेन प्रयोज्यम् ॥

**अर्थ**—तिसरें सायंसवन मात्र उंच आहे असें जाणावें. त्याचा प्रयोग (पठन) नेहमीं शिरःस्थित असला पाहिजे. ह्याकरितां, मस्तकांत उत्पन्न होणाऱ्या व मोर, हंस किंवा मेघ ह्यांच्या शब्दाप्रमाणें उंच व गंभीर असलेल्या आवाजानें तृतीय सवनाचे वेळेस ह्मणजे सायंकाळीं, पठन करावें. कारण ह्यावेळीं क्रमप्राप्त असा खडास्वरच योग्य असून तोच जुळतो. 'मारुतस्तूरसि' ह्या सातव्या श्लोकांमध्येंही ह्या सवनांचे वर्णन पूर्वीं आलें आहे. छत्तीस व सदतीस ह्या दोन्हीं श्लोकांचें वृत्तही उपजातिच आहे. ॥३७॥

**अचोऽस्पृष्टा यणस्त्वीषन्नेमस्पृष्टाः शरः स्मृताः ॥**
**शेषाः स्पृष्टा हलः प्रोक्ता निबोधानुप्रदानतः ॥ ३८ ॥**

**अन्वयः** ॥ अचः अस्पृष्टाः ( सन्ति ) यणस्तु ईषत् ( स्पृष्टाः सन्ति ) शरः नेमस्पृष्टाः स्मृताः (सन्ति) शेषाः हलः स्पृष्टाः प्रोक्ताः ( सन्ति अतः ) अनुप्रदानतः निबोध ॥

**अर्थ**—दहाव्या श्लोकांत पञ्चधा वर्णविभाग सांगितला. त्यापैकीं स्वर, काल व स्थानें ह्यांचे वर्णन झालें. आतां ह्यापुढें प्रयत्नानीं होणारा वर्णविभाग सांगतात. प्रयत्न व अनुप्रदान ( बाह्य प्रयत्न ) ह्मणजे काय हे, आह्मीं मागें दहाव्या श्लोकाच्याच विवरणामध्यें प्रसंगानें लिहून ठेवलें आहे. अच् ह्मणजे स्वर हे अस्पृष्ट आहेत ह्मणजे ह्यांचा स्पृष्ट प्रयत्न नाहीं. सारांश ह्यांच्या उच्चारणाचे वेळीं त्या त्या स्थानांच्या स्पर्शाचा प्रयत्न ( प्रकृष्टयत्न, मोठा यत्न ) लागत नाहीं; तें काम सहज होतें. यण् ह्मणजे यवरल ह्यानां ईषत्स्पृष्ट ह्मणतात ह्मणजे ह्यांचा किंचित् स्पृष्ट प्रयत्न

आहे. शर ह्मणजे श ष स हे नेमस्पृष्ट आहेत असें सांगितलें आहे. म्हणजे ह्या तिघांचा अर्धा स्पृष्ट प्रयत्न आहे. कारण संस्कृ-तांत नेम ह्या शब्दाचा अर्थ अर्धा ( निम्मा ) असा आहे. असो. ह्याशिवाय शिलक राहिलेले हल् ( व्यञ्जने ) म्हणजे ककारापासून मकारापर्यंत पंचवीस व हकार असे सव्वीस वर्ण स्पृष्ट सांगितले आहेत. म्हणजे ह्यांचा पूर्ण स्पृष्ट प्रयत्न आहे. अर्थात् ह्यांच्या उच्चाराच्यावेळीं तत्तद्योग्य स्थानांस स्पर्श करतानां पूर्ण प्रयत्न लागतो. आतां ह्यापुढें अनुप्रदानानीं, म्हणजे वर्णोत्पत्तीनंतर त्या वर्णांच्या विकासास लागणाऱ्या बाह्यप्रयत्नानीं होणारा वर्णांचा विभाग सांगू. तो नीट जाणून घ्या. ॥ ३८ ॥

**अमोऽनुनासिका न ह्रौ नादिनो हझषः स्मृताः ॥**
**ईषन्नादायणो जश्च श्वासिन तु खफादयः ॥ ३९ ॥**

**ईषच्छ्वासांश्चरो विद्याद् गोर्धामैतत्प्रचक्षते ॥**
**दाक्षीपुत्रपाणिनिना येनेदं व्यापितं भुवि ॥ ४० ॥**

**अन्वयः**— ॥ अमः अनुनासिकाः ( सन्ति ) ह्रौन ( स्तः ), हझषः नादिनः स्मृताः [ सन्ति ], यणः जश्च ईषन्नादाः [ सन्ति ], खफादयस्तु श्वासिनः [ सन्ति ], चरः ईषच्छ्वासान् विद्यात्. एतत् गोः धाम प्रचक्षते. दाक्षीपुत्रपाणिनिना येन [ धाम्ना ] इदं [ शास्त्रं ] भुवि व्यापितम् ॥

**अर्थ**—अम् प्रत्याहारांतले वर्ण म्हणजे अइउऋऌ ए ओ ऐ औ हय-वरल ञमङणन, हे अनुनासिक आहेत. म्हणजे ह्यांचे नासिकासहोच्चार हें अनुप्रदान आहे. परंतु ह्यापैकीं हकार व रेफ अनुनासिक नाहींत असे 'नह्रौ'

हया दोन पदानीं सांगितलें आहे. ‘ अनु प्रकर्षेण दीयते तदनुप्रदानम् ’ म्हणजे वर्णोत्पत्तीच्या मागून त्या वर्णांच्या स्पष्ट अभिव्यक्तीकरता जें अधिक बळ दिलें जातें तें अनुप्रदान ( बाहयप्रयत्न ) होय. अशी अनुप्रदान हया शब्दाची व्युत्पत्ति आहे. ‘ अनुनासिकोन्त्यः ’ हया प्रातिशाख्यसूत्रावरून त्या अमांपैकीं ञमङणन हे नित्य अनुनासिक असून इतर म्हणजे स्वर व यवल हे विकल्पानें अनुनासिक आहत. हकार आणि झ भ घ ढ ध हे नादयुक्त आहत, म्हणजे हयांचें नाद हें अनुप्रदान [ बाहयप्रयत्न ] आहे. यवरळ जबगडद हे ईषन्नाद आहेत, म्हणजे हयांचे ईषन्नाद हें अनुप्रदान ( बाहयप्र० ) आहे. ख फ छ ठ थ हे वर्गांतील द्वितीयवर्ण तर श्वासयुक्त आहेत. म्हणजे हयांचें श्वाससंज्ञक अनुप्रदान [ बाहयप्र० ] आहे. च ट त क प श ष स हे चर प्रत्याहारांत हे वर्ण ईषच्छ्वास युक्त आहेत असें जाणावें. म्हणजे हयांचे किंचित्-श्वास [ अल्पप्राण ] हे अनुप्रदान [ बाहयप्र० ] आहे. नाद व श्वास हयांचीं स्वरूपें समजण्याकरितां ऋक्प्रातिशाख्याच्या तेराव्या पटलांतले पहिलें सूत्र देऊन त्याचा अर्थ देतो. “ वायुः प्राणः कोष्ठ्यमनुप्रदानं कण्ठस्य खे विवृते संवृते वा आपद्यते श्वासतां नादतां वा वक्त्रीहायाम् ” हयाचा अर्थ कोठयांत असणारा वर्णांचा प्रेरक प्राणवायूच अनुप्रदान होय. तो वर येत असतां, वक्त्याच्या इच्छेनें घशांतली पोकळी विस्तृत झाली असतां, श्वासपणाला; व तीच पोकळी संकुचित झाली झाली असतां नादरूपतेला प्राप्त होतो. असो. दहाव्या श्लोकापासून येथपर्यंत स्वर, काल, स्थान, प्रयत्न व अनुप्रदान हया पांच प्रकारांनी सविस्तर प्रतिपादन केलेल्या हया पांच वर्णविभाजकानांच वाणीचें स्थान असें म्हणतात. दाक्षीचा पुत्र अस-

णाऱ्या पाणिनीनें त्या ह्या वर्णीस्थानाच्या आश्रयानेंच हें शिक्षारूपी शास्त्र पृथ्वीवर प्रसिद्ध केलें. ह्या उल्लेखावरून ह्या शिक्षेला आधारभूत असा, पाणिनीचा एखादा शिक्षाग्रंथ असावा असें वाटतें; किंवा त्याच्या व्याकरणांत आलेल्या शिक्षेंतल्या विषयाला अनुलक्षून हा उल्लेख असेल. बऱ्याच पुस्तकांत 'दाक्षीपुत्रः पाणिनिना' असा पाठ आहे. 'सुपांसुलुक्' ह्या छांदस सूत्रानें तृतीयेच्या प्रत्ययाला सु आदेश केला आहे अशी कल्पना करून त्याचेंही समाधान करतां येईल परंतु शिक्षेंत इतरत्र कोठेंही आर्ष [छांदस] प्रयोग नाहींत ह्मणून वर आह्मीं स्वीकारलेला पाठच आम्हांस शुद्ध व पसंत वाटला आहे. ह्याप्रमाणें आणखीही क्वचित् स्थलीं प्रचलीत अपभ्रष्ट पाठ भेद सोडून देऊन अर्थास सुसंगत असा एकच पाठ निश्चित केला आहे. ॥ ३९।४० ॥

**छन्दः पादौतु वेदस्य हस्तौ कल्पोऽथ पठते ॥**
**ज्योतिषामयनं चक्षुः निरुक्तं श्रोत्रमुच्यते ॥ ४१ ॥**

**अन्वय**—छन्दस्तु वेदस्य पादौ ( अस्ति ), अथ कल्पः हस्तौ ( इति ) पठयते, ज्योतिषाम् अयनं चक्षुः (अस्ति), निरुक्तं श्रोत्रम् उच्यते ॥

**अर्थ**—आतां शिक्षा वगैरे वेदषडंगांच्या अध्ययन वगैरेची आवश्यकता दाखविण्याकरितां, व त्यांच्या प्रसिद्ध असलेल्या वेदाङ्गत्वाचें निर्वचन समजण्याकरितां, स्पष्ट वर्णन करितात. छन्दःशास्त्र हें वेदाचें पाय असून कल्पसूत्रें त्याचे हात आहेत असें म्हणतात. आकाशस्थ ताऱ्यांच्या गतीचे बोधक असणारें ज्योतिःशास्त्र हें वेदाचे नेत्र आहेत; व निरुक्त हें वेदाचे कान आहेत असें म्हणतात. ॥ ४१ ॥

**शिक्षा घ्राणं तु वेदस्य मुखं व्याकरणं स्मृतम् ॥**
**तस्मात्साङ्गमधीत्यैव ब्रह्मलोके महीयते ॥ ४२ ॥**

**अन्वयः**—॥ शिक्षा तु वेदस्य घ्राणम् ( अस्ति ), व्याकरणं मुखम् स्मृतम् ( अस्ति ) तस्मात् साङ्गम् एव अधीत्य ब्रह्मलोके महीयते ॥ ४२ ॥

**अर्थ व विवरणः**—हें शिक्षाशास्त्र तर वेदाचें प्रत्यक्ष नाक आहे व व्याकरणशास्त्र वेदाचें मुख आहे असें सांगितलें आहे. ह्याकरितां नुसता वेद म्हणून उपयोग होणार नाहीं, तर ह्या साही अंगांनीं युक्त अशाच वेदाचें अध्ययन करणारा, वेदपाठक ब्रह्मलोकीं जाऊन पूजा वगैरे गौरवास मिळवितो. अथवा ह्या जन्मांतही ब्रह्मलोकांत म्हणजे विद्वत्समाजांत सन्मान पावतो असाही अर्थ करतां येईल. सर्वांना स्पष्ट बोध होण्याकरितां, ह्या अंगांचें अधिक विवरण करतो. मंत्रांत व लोकांत येणाऱ्या गायत्री, उष्णिक् वगैरे वृत्तांचें व त्यांच्या अवांतर भेदांचें बोधक जें शास्त्र त्याला छन्दःशास्त्र असें ह्मणतात. तें पिंगलाचार्यांनीं रचिलेलें असून हल्लींही वैदिकांच्या पाठांत आहे. वेदांत विधान केलेल्या कर्मांचें क्रमानें व व्यवस्थितपणानें बोधन करणारें जे शास्त्र त्याला कल्पसूत्र अथवा नुसतें सूत्र असेंच ह्मणतात. हीं सूत्रें शाखा-भेदानें; आश्वलायन, बौधायन, आपस्तंब, गोभिल वगैरे अनेक असून त्यांचें कर्तेही निरनिराळे आहेत. आणखी त्यांतही गृह्यसूत्रें ( स्मार्तसूत्र ) व श्रौत-सूत्रें ( कल्प ) असे दोन भाग आहेत. जीं सूत्रें, मौंजीगर्भाधानादि संस्कारांची व एकाग्नि साध्यक कर्मांची बोधक आहेत तीं गृह्यसूत्रें; आणि तीन अग्नींनींच होणारीं जीं अग्निहोत्र्यांचीं ज्योतिष्टोमादिक यज्ञकृत्यें त्यांचीं बोधक तीं श्रौतसूत्रें जाणावीं. जें शास्त्र, आकाशांतील तेजोगोलकांच्या गतिवरून यज्ञादिकांच्या योग्य कालाचें बोधक आहे तें ज्योतिःशास्त्र होय. ह्यावर अनेक

ग्रंथ आहेत तथापि हल्लीं वैदिकांच्या पाठांत, लगधमतास अनुसरणाऱ्या शुचि नामक ऋषींनें रचिलेलें ज्योतिषच असून तें फारच त्रोटक आहे. वेदमंत्राचें अर्थ, पदव्युत्पत्ति, देवता वगैरेंचा निर्णय करण्याची रीति शिकविणाऱ्या शास्त्राला निरुक्त असें ह्मणतात. हे यास्काचार्यांनीं रचिलें असून हल्लींही वैदिकांच्या पाठांत आहे. निरुक्त हा सर्वमान्य ग्रंथ पाणिनिपक्षांहि प्राचीन असून, सायणाचार्यांनीं वेदभाष्य लिहितांना ह्याचा फार उपयोग केला आहे. शिक्षा ह्मणजे स्वरांचा व वर्णांचा शुद्ध उच्चार कसा करावा ह्याचें बोधकशास्त्र होय. आह्मीं ह्या ग्रंथांत जिचें महाराष्ट्रीत सविस्तर विवरण लिहीत आहों ती ही शिक्षा पिंगलाचार्यानें पाणिनीच्या मताला अनुसरून लिहिली आहे. व हीच हल्लीं वैदिकांच्या पाठांत आहे. हिला बहुधा पाणिनीयशिक्षा असें म्हणतात. वैदिक व लौकिक शब्दांची सिद्धि व व्युत्पत्ति करून देणाऱ्या शास्त्राला व्याकरण शास्त्र म्हणतात. हें पाणिनि महर्षीनें रचिलें असून त्याचें आठ अध्याय आहेत म्हणून त्याला अष्टाध्यायी असें म्हणतात. हेंच हल्लीं वेदांगांत व दशग्रंथांत गणिलेलें आहे. ह्या अष्टाध्यायी-वर असलेली भट्टोजिदीक्षितांची सिद्धांतकौमुदी ही वृत्ति सुप्रसिद्ध आहे. ह्या सर्व वेदांगभूत शास्त्रांवर पुढें शेकडो ग्रंथ होऊन त्यांचा मोठा विस्तार झाला आहे. ( शं. बा. दीक्षित ह्यांचा भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास पहा ) परंतु मूळ वेदांग ग्रंथ हेच आहेत असें मानतात. ह्यांच्या पूर्वीचे ग्रंथ, ह्यांच्या उत्तमपणामुळें मागें पडले आहेत. प्रातिशाख्यें हा शिक्षा छंद व व्याकरण. ह्यांचाच विस्तार होय. वेदांचे अध्ययन अर्थज्ञान व तद्विहित कर्मांचें अनुष्ठान ह्यांची सिद्धि ह्या शास्त्रांच्या अध्ययनाशिवाय होणें शक्यच नाहीं, हें वरच्या लिहिण्यावरून

पूर्ण लक्षांत येईल. ह्याकरितांच ह्यांना वेदागें असें नांव असून अजून देखील वेदाबरोबर ह्यांची अध्ययन परंपरा, सर्वत्र विशेषतः ऋग्वेदी लोकांत चालू आहे इतकें ह्यांचें महत्व आहे. त्यांतही हें शिक्षाशास्त्र तर वेदांचे नाक आहे. नाकाशिवाय मनुष्याची शोभा अगदीं जाऊन तो कुरूप गणला जातो, त्याचप्रमाणे शिक्षेशिवाय वेदाची अवस्था होईल, कारण स्वरवर्णोच्चारणाचें शुद्ध ज्ञान नसल्यास मूळ अध्ययनाचीच सिद्धि होणार नाहीं; अर्थज्ञान वगैरे ह्या त्यापुढच्या पायऱ्या आहेत; म्हणून शिक्षाशास्त्र वेदाचें नाक ( सर्वशोभा ) आहे. त्याचें ज्ञान अगोदर अवश्य मिळविलें पाहिजे. ह्याशिवाय ह्या नाकानेंच वेदपठनाच्या बरेवाईटपणाचा वास कळेल. बाकीच्या अंगांविषयीं विशेष विचार त्या त्या अंगांचे अर्थ करतानां येईलच म्हणून आतां हें बरेंच लांबलेलें विवेचन पुरें करतो. तथापि हें विवरण सर्व वेदांगांच्या प्रस्तावनेदाखल असल्यामुळें नेहमीं पूर्ण लक्षांत असावें, ह्यांचा येथेंच ऊहापोह करण्याचें कारण कीं, शिक्षा हें षडंगापैकी अगदी पहिले वेदांग आहे. कारण ह्याशिवाय इतर वेदांगाचा आरंभ आरंभार्थक अथ शब्दानें झालेला नाहीं. ॥ ४२॥

**उदात्तमाख्याति वृषोऽङ्गुलीनां प्रदेशिनीमूलनिविष्टमूर्धा ॥**
**उपान्तमध्ये स्वरितं धृतश्च कनिष्ठिकायामनुदात्तमेव ॥ ४३ ॥**

**अन्वयः** ॥ प्रदेशिनीमूलनिविष्टमूर्धा अंगुलीनां वृषः, उदात्तम् आख्याति. ( तस्याः ) उपान्तमध्ये धृतः ( सः ) स्वरितम् ( आख्याति ) कनिष्ठिकायाञ्च [ धृतः ] अनुदात्तमेव [ आख्याति ] ॥

**अर्थः**—येथपर्यंत वर्णोच्चाराची माहिती सांगितली. आतां, स्वरोच्चारांचें वर्णन करतात, अकराव्या श्लोकावर लिहितांना उदात्तादिक तिन्ही स्वरांची

स्वरूपें स्पष्ट दिलेलींच आहेत. अंगुलींच्या मुख्याचें म्हणजे आंगठ्याचें टोक तर्जनीच्या (आंगठ्याशेजारचें बोट) मुळाशीं ठेवलें असतां, तो आंगठा उदात्त स्वराचें कथन करतो. म्हणजे वेदपठनांत उदात्त स्वरांचा उच्चार करतेवेळीं, तर्जनीच्या मुळाशीं आंगठ्याचे अग्र लावावें. तोच आंगठा तर्जनीच्या शेवटाच्या जरा अलीकडे म्हणजे तिसऱ्या पेरावर ठेवला असतां, स्वरित स्वर सुचवितो; आणि तो आंगठा कनिष्ठिकेच्या (करंगळी) शेंड्याजवळ ठेवला असतां अनुदात्ताचें प्रतिपादन करतो. उदाहरण. 'स्वस्तये' ह्यांतील स्व, स्त आणि ये ह्यांचें अनुक्रमानें अनुदात्त, उदात्त व स्वरित हें स्वर उच्चारतानां क्रमानें करंगळीच्या शेंड्यावर, तर्जनीच्या शेंड्यावर व तर्जनीच्या मूळावर आंगठा ठेवावा लागतो. ह्याप्रमाणेंच सर्वत्र जाणावें, ह्या श्लोकाचें वृत्त उपेन्द्रवज्रा आहे. ॥ ४३ ॥

**उदात्तं प्रदेशिनीं विद्यात्प्रचयं मध्यतोऽङ्गुलिम् ॥**
**निहतं तु कनिष्ठिक्यां स्वरितोपकनिष्ठिकाम् ॥ ४४ ॥**

**अन्वयः**॥ प्रदेशिनीम् उदात्तं विद्यात्, मध्यतः (स्थितम्) अंगुलिम् प्रचयं (विद्यात्) कनिष्ठिक्यां तु निहतं (विद्यात्), उपकनिष्ठिकाम् स्वरितः (इति विद्यात्) ॥

**अर्थ**—आतां ह्या श्लोकांत दुसऱ्या प्रकारानें स्वरनिर्देश सांगतात. तर्जनीवर आंगठा ठेवला असतां उदात्त स्वर जाणावा, मध्यमांगुलीवर (मधलें बोट) ठेवला असतां, प्रचयनामक एक श्रुति जाणावी. संहितेंत स्वरितस्वरापुढें, जेवढे अनुदात्त येतील त्यांची एक श्रुति होते, म्हणजे त्या स्वरिताच्या उदात्त भागाप्रमाणेंच त्या सर्वांचें श्रवण होतें; अनुदात्तत्व ऐकूं येत नाहीं. ह्या एक

श्रुतीचे नियम; अष्टाध्यायीमध्यें पाणिनीनें, 'स्वरितात्संहितायामनुदात्तानाम्' वगैरे सूत्रानीं सांगितले आहेत, त्यावरून जाणावे. उदाहरण. 'इमंम गंगे यमुने सरस्वति शुतुद्रि' ह्या मंत्रांत मेच्या पुढल्या गंगे वगैरे मधील अनुदात्ताची एकश्रुति झाली आहे. एक श्रुति म्हणजे प्रचय होय. ह्या प्रचयाचें बोधक मधलें बोट आहे. असो. आतां उत्तरार्धाचा अर्थ लिहितो. कनिष्ठिकेवर अंगठा ठेवला असतां, अनुदात्त स्वर जाणावा; व उपकनिष्ठिकेवर ह्मणजे करंगळी जवळच्या बोटावर आंगठा ठेवला असतां स्वरितस्वर ओळखावा. स्वरितः उपकनिष्ठिकाम् ह्या दोन पदांमध्यें अपाणिनीय संधि आहे तो श्लोक जुळण्याकरितां किंवा अर्थाच्या धोरणानें एखाद दुसरें अक्षर कमजास्त झालें. आहे. तें 'छन्दोवत्सूत्राणि' ह्या प्रसिद्ध वचनास धरून युक्त आहे. ॥४४॥

**अन्तोदात्तमाद्युदात्तमुदात्तमनुदात्तं नीचस्वरितम् ॥**

**मध्योदात्तं स्वरितं द्व्युदात्तं त्र्युदात्तमिति नव पदशय्याः ॥४५**

**अन्वयः** ॥ अन्तोदात्तम्, आद्युदात्तम्, उदात्तम्, अनुदात्तम्, नीचस्वरितम्, मध्योदात्तम्, स्वरितम्, द्व्युदात्तम्, त्र्युदात्तम्, (इति) नव पदशय्याः (सन्ति) ॥

**अर्थ**–ह्या सूत्रानें पदांमधून किती जातीचे स्वरांचे प्रकार होऊं शकतात तें लिहितात. अंतोदात्त, आद्युदात्त, उदात्त, अनुदात्त, नीचस्वरित, मध्योदात्त, स्वरित, द्व्युदात्त, आणि त्र्युदात्त ह्याप्रमाणें नऊ पदांतील स्वरांच्या शय्या म्हणजे स्थिति आहेत, 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' ह्या स्वरविषयक

परिभाषेनें, ज्या पदांत एखाद्या उदात्ताचें किंवा स्वरिताचें विधान असेल त्या एका स्वराशिवाय त्या पदामधले इतर सर्व स्वर अनुदात्त होतात. तसेंच 'उदात्तादनुदात्तस्यस्वरितः' म्हणजे उदात्तापुढच्या अनुदात्ताला स्वरित होतो असे सामान्य नियम आहेत. परंतु द्व्युदात्त व त्र्युदात्त हे अपवादक नियमानेंच क्वचित् स्थलीं होतात असें समजावें. ह्या श्लोकाच्या सर्वच चरणांत कमजास्त अक्षरें आहेत ह्मणून हें गाथावृत्त आहे. ह्या पुढच्या दोन श्लोकाचें ही गाथावृत्त आहे असें समजावें. ॥ ४५ ॥

**अग्निः सोमः प्रवो वीर्यं, हविषां, स्वर्बृहस्पतिरिन्द्राबृहस्पती ॥**
**अग्निरित्यन्तोदात्तं सोम इत्याद्युदात्तं प्रेत्युदात्तं, व इत्यनुदात्तं**
**वीर्यं नीचस्वरितम् ॥४६॥**

**हविषां मध्योदात्तं, स्वरिति स्वरितम् ॥**
**बृहस्पतिरिति द्व्युदात्तमिन्द्राबृहस्पती इति त्र्युदात्तम् ॥ ४७॥**

**अन्वयः** ॥ अग्निः, सोमः, प्र, वः, वीर्यम्, हविषाम्, स्वः, बृहस्पतिः, इन्द्राबृहस्पती; ( इत्युदाहरणानि). अग्निः इति अन्तोदात्तम् ( अस्ति ), सोमः इति आद्युदात्तम् (अस्ति ), प्रइति उदात्तम् ( अस्ति ), वः इति अनुदात्तम् (अस्ति), वीर्यम् (इति) नीचस्वरितम् [अस्ति] हविषाम् [ इति ] मध्योदात्तम् (अस्ति), स्वः इति स्वरितम् [अस्ति], बृहस्पतिः इति द्व्युदात्तम् ( अस्ति ), इन्द्राबृहस्पती इति त्र्युदात्तम् [ अस्ति ] ॥

**अर्थ व विवरण**—वरच्या श्लोकांत सांगितलेल्या नऊ प्रकारांची; अ॒ग्निः, सोमः प्र, व॒ः, वी॒र्य॑म्, ह॒विषा॑म्, स्वः, बृह॒स्पति॑ः, इ॒न्द्रा॒बृह॒स्पती ही नऊ उदाहरणें आहेत.

त्यांपैकीं, 'अ॒ग्निः' हें पद अंतोदात्त आहे. कारण व्युत्पत्तिपक्षीं 'अंगेर्न-लोपश्च ( चकारात् निः )' ह्या उणादिसूत्रानें, अंगधातू हून निप्रत्यय लावून व नलोपकरून अग्निशब्द साधला असतां, 'आद्युदात्तश्च' ह्यासूत्रानें नि ह्या प्रत्ययाचा स्वर उदात्त होतो. आणि अव्युत्पत्तिपक्ष घेतला असतां, 'घृता-दीनांच' ह्या फिट्सूत्रानें अग्निशब्द अंतोदात्त होतो व मागचा अकार, मागं लिहिलेल्या 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' ह्या पाणिनीच्या सामान्य परिभाषेनें अनुदात्त होतो. ह्मणून एकंदरींत अ॒ग्निः हें पद अंतोदात्त झालें. सोमः' हें पद आद्युदात्त आहे. कारण, 'ग्रामादीनांच' ह्या फिट्सूत्रानें, किंवा 'वृषा-दीनां च' ह्या पाणिनिसूत्रानें, सो मधला ओकार उदात्त ठरला, व नंतर मकारांतल्या अकाराला वरच्याप्रमाणेंच अनुदात्तत्व येऊन पुढें 'उदात्तादनु-दात्तस्य स्वरितः' ह्या मागें दिलेल्या परिभाषेनें तो अ स्वरित झाला. व एकं-दर सोमः हें पद आद्युदात्त ठरलें. 'प्र' हें पद उदात्त आहे. कारण 'प्रादयः' ह्या पाणिनिसूत्रानें त्याला निपातसंज्ञा आहे. व निपाता आद्यु-दात्ताः' ह्या फिट्सूत्रानें नंतर त्याला उदात्तत्व येतें. 'व॒ः' हें पद अनुदात्त आहे. कारण 'अनुदात्तं सर्वमपादादौ' ह्या अधिकारां-तल्या 'बहुवचनस्य वस्नसौ' ह्या सूत्रानें सविभक्तिक युष्मद्-शब्दाला वः हा अनुदात्त आदेश होतो. 'वी॒र्य॑म्' हें पद नीचस्वरित आहे.

कारण ह्या शब्दांत वीशब्दाहून ' तत्रसाधुः ' ह्या सूत्रानें यत्प्रत्यय केला आहे., तो ' तित्स्वरितम् ' हया सूत्रानें स्वरित असून वीचा ईकार पूर्ववत् सामान्य परिभाषेनें, नीच ह्मणजे अनुदात्त झाला. हयामुळें हें पद नीच स्वरित झालें. हविषाम् ' हें पद मध्योदात्त आहे. हयापैकीं, वि मधला ईकार ' फिषोऽन्त उदात्तः=प्रातिपदिकाचा अंत उदात्त होतो. ' हया सूत्रानें, उदात्त आहे. हकाराचा अकार पूर्ववत् ' अनुदात्तं पदमेकवर्जम् ' हया सूत्रानें अनुदात्त झाला. त्यानतर अनुदात्तौ सुप्पित्तौ ' हया सूत्राप्रमाणें, अनुदात्त असलेला आम् प्रत्ययाचा आकार ' उदात्तादनुदात्तस्य स्वरितः ' हया मागें लिहिलेल्या परिभाषेनें स्वरित झाला; व एकंदरींत हविषाम् हें पद मध्योदात्त राहिलें. ' स्वः ' हें पद ' न्यङ्स्वरौ स्वरितौ ' हया फिट् सूत्रानें स्वरित आहे. ' बृहस्पतिः ' ह्यांतली दोन्ही पदें ' उभे वनस्पत्यादिषु युगपत् ' हया सूत्रानें प्रकृतीनें राहतात म्हणजे त्यांचे मूळचे स्वर तसेच राहतात, समासामुळें स्वर बदलत नाहींत. त्यापैकीं बृहत् हयाचा वनस्पत्यादि गणांत आद्युदात्त पाठ केला असून, पतिशब्द पाधातूहून डतिप्रत्यय लावून साधिला असल्यामुळें प्रत्ययस्वरानेंच आद्युदात्त आहे, ह्याप्रमाणें एकंदरींत बृ आणि प हे उदात्त असून नंतर, ह आणि ति ह्यांच स्वर मागें दिलेल्या दोन परिभाषांनीं अनुक्रमानें अनुदात्त व स्वरित झाले आहेत, म्हणून 'बृहस्पतिः' हें पद द्व्युदात्त राहिलें. 'इन्द्राबृहस्पती' हें नवें पद त्र्युदात्त आहे, ह्मणजे ह्यांमध्यें तीन उदात्त स्वर आहेत, 'ऋज्रेन्द्राग्रवज्रः' ह्या उणादि सूत्रांत, इदि धातूहून रन् प्रत्यय करून साधलेल्या इंद्र शब्दाचे निपातन केलें असल्यामुळें, रन् प्रत्यय नित् (नकार इतानें युक्त) आहे

म्हणून 'ञ्नित्यादिर्नित्यम्' ह्या सूत्रानें इन्द्र शब्द आद्युदात्त आहे. ह्याचा बृहस्पति-शब्दाशीं समास केला असतां, 'देवताद्वन्द्वेच' ह्या सारखीच आनुपूर्वी असलेल्या दोन सूत्रांनीं, अनुक्रमानें दोन्हीं पदें मूळ स्वरानेंच राहिलीं; व इंद्र-शब्दाच्या शेवटीं आकार लागला. ह्मणून इ वृ प हे तीन स्वर उदात्त झाले व परिभाषानीं इतर स्वर अनुदात्त होऊन त्यांतला तीचा स्वर स्वरित झाला आहे. वरच्या विवरणांतली पाणिनीयादिक सूत्रें, सिद्धांतकौमुदी ग्रंथाच्या अनुरोधानें दिलीं आहेत. हें स्वर प्रकरण व्याकरणशास्त्र ह्मणणारानांच पूर्णपणें कळण्यासारखें आहे. तथापि इतरानांही थोडीशी दिशा समजावी ह्मणून येथल्या प्रासंगिक पदांवरच थोडासा विस्तार करून, हा स्वर सिद्धीचा ऊहापोह केला आहे. ईशकृपेनें पुढच्या सर्व वेदांगांच्या भाषांतर सिद्धिचा योग आल्यास, अष्टाध्यायीच्या विवरणांत हा विषय सर्व व सविस्तर देऊं ॥ ४६ ॥ ४७ ॥

**अनुदात्तो हृदि ज्ञेयो मूर्ध्न्युदात्त उदाहृतः ॥**
**स्वरितः कर्णमूलीयः सर्वास्ये प्रचयः स्मृतः ॥ ४८ ॥**

**अन्वयः ॥** अनुदात्तः हृदि ज्ञेयः उदात्तः मूर्ध्नि उदाहृतः ( अस्ति ) स्वरितः कर्णमूलीयः ( अस्ति ), प्रचयः सर्वास्ये स्मृतः ( अस्ति ) ॥

**अर्थ**-अनुदात्त स्वर हृदयस्थानांत उत्पन्न होतो असें जाणावें. उदात्त मूर्धस्थानीं उद्भवतो असें ह्मटलें आहे. स्वरित स्वर कर्णमूलाजवळ उत्पन्न होतो, आणि चव्वेचाळीसाव्या श्लोकाचे व्याख्यानांत सांगितलेला प्रचय ( एकश्रुति ) हा, सर्व मुखांतच उत्पन्न होतो असें ह्मटलें आहे. त्याचें विशेष निराळें स्थान नाहीं. ॥ ४८ ॥

**चाषस्तु वदते मात्रां द्विमात्रं त्वेव वायसः ॥**
**शिखी रौति त्रिमात्रं तु नकुलस्त्वर्धमात्रकम् ॥ ४९ ॥**

**अन्वयः** ॥ चाषस्तु मात्रां वदत, वायसस्तु द्विमात्रम् एव ( वदत ), शिखीतु त्रिमात्रं रौति, नकुलस्तु अर्धमात्रकम् ( रौति ) ॥

**अर्थः**—मागें दिलेल्या श्लोकांत 'संवृतं मात्रिकं ज्ञेयं' असा मात्राशब्दाचा व्यवहार केला आहे. व आह्मींहीं एकदोनदां मात्रेची माहिती देऊन ( श्लोक ५ व ११ पहा ) दृष्टांत दिले आहेत आणि "एकमात्रो भवेद् र्‍हस्वो द्विमात्रो दीर्घ उच्यते ॥ प्लुतस्त्रिमात्रो विज्ञेयो व्यञ्जनं त्वर्धमात्रकम् ॥" ह्या श्लोकाचा अर्थही दिला आहे. आतां येथें शिक्षासूत्रकार स्वतःच, दुसऱ्या दृष्टांतांनीं मात्राकाल निश्चित करितात. चाषपक्षी एकमात्रिक शब्द करतो; ह्मणजे त्याच्या शब्दोच्चारणाचा काल तोच एक मात्राकाल होय. कावळा दोन मात्रा इतक्या कालांत एक शब्द करतो, मोर तीन मात्रा इतक्या कालांत आपला एक शब्द उच्चारतो; व मुंगुस तर अर्धमात्राकालात एक शब्द उच्चारतो. ह्यावरून मात्राकाल ओळखून त्याप्रमाणें र्‍हस्वादिकांचे उच्चार करीत जावे. ॥ ४९ ॥

**कुतीर्थादागतं दग्धमपवर्णं च भक्षितम् ॥**
**न तस्य पाठे मोक्षोऽस्ति पापाहेरिव किल्बिषात् ॥ ५० ॥**

**अन्वयः** ॥ कुतीर्थात् आगतं (ब्रह्म) दग्धम ( अस्ति ), अपवर्णं च भक्षितम् ( अस्ति ); पापाहेः किल्बिषात् इव तस्य पाठे मोक्षः नास्ति ॥

**अर्थ**—सांग वेदाध्ययन न केलेला व अनाचारी अशा वाईट गुरूपासून आलेलें ( शिकलेलें ) वेदब्रह्म दग्ध ( जळकें ) अथवा मेल्यासारखेंच होय.

आणि मधलीं मधलीं अक्षरें गळलेलें जें शब्द ब्रह्म, तें भक्षित ह्मणजे खाल्यासारखें होय. ज्याप्रमाणें भयंकर सर्पानें चाखून दूषित केलेलें अन्न त्याच्या विषसंपर्कामुळें, खाल्यास पोषक तर नाहींच परंतु उलट घातक मात्र होते; त्याप्रमाणेंच कुतीर्थ ह्मणजे दुष्टगुरु त्या कडून आलेल्या व भ्रष्टवर्ण असलेल्या वेदाच्या पठनानें, मोक्षादिक फलें तर मुळींच मिळणार नाहींत; परंतु तें पठण उलट वेदपाठकास घातक होईल ॥ ५० ॥

**सुतीर्थादागतं व्यक्तं स्वाम्नायं सुव्यवस्थितम् ॥**
**सुस्वरेण सुवक्त्रेण प्रयुक्तं ब्रह्म राजते ॥ ५१ ॥**

**अन्वयः** ॥ सुतीर्थात् आगतं व्यक्तं स्वाम्नायं सुव्यवस्थितं सुस्वरेण सुवक्त्रेण च प्रयुक्तं ब्रह्म राजते ॥

**अर्थ**—सांग अध्ययन केलेल्या व सदाचारी असलेल्या चांगल्या गुरूकडून आलेलें, अगदीं स्पष्ट, चांगल्या व्यवस्थित रीतीनें अध्ययन केलेलें, व चांगल्या आवृत्ति ह्मटलेलें असून उत्तम आवाजानें व मुखगत स्थानादिकांच्या उत्तम विवेकानें पठन केलेलें वेदब्रह्म, तेजस्वी असतें; आणि शोभतें. तात्पर्य, अशा वेदपठनानें, मोक्षादिक सर्व शास्त्रोक्त फळें अवश्य मिळतात. ॥ ५१ ॥

**मन्त्रो हीनः स्वरतो वर्णतो वा मिथ्याप्रयुक्तो न तमर्थमाह ॥**
**स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रुः स्वरतोऽपराधात् ॥५२॥**

**अन्वयः** ॥ स्वरतः वर्णतः वा हीनः मन्त्रः मिथ्याप्रयुक्तः ( अस्ति, सः ) तम् अर्थम् न आह. सः वाग्वज्रः यथा इन्द्रशत्रुः स्वरतः अपराधात् [ विनष्टः तथा ] यजमानं हिनस्ति ॥

**अर्थ**—आतां, ह्यापुढेंही चार श्लोकांनीं वेद पाठकाचे दोष गुण सांगतात. यथायोग्य स्वरानें किंवा वर्णानें विरहित असा केलेला मंत्रोच्चार म्हणजे प्रत्यक्ष खोटा प्रयोग समजावा. कारण तसा मंत्र इच्छितार्थाचें प्रतिपादन करीत नाहीं, अर्थात् यथायोग्य फळही देत नाहीं. एवढेंच नव्हे तर तें दुर्मंत्ररूपी शब्दात्मक वज्र, जसा पूर्वी स्वराच्या चुकीनें इंद्रशत्रूचा नाश केला, त्याप्रमाणें यजमानाचा घात करतें. हें स्पष्ट समजण्याकरितां, शातपथ ब्राह्मणांतले सांप्रदायिक आख्यान लिहितो. पूर्वी देवांचा पुरोहित व असुरांचा भाचा असलेला विश्वरूप नामक ब्राह्मण, यज्ञामध्यें देवांना उघडपणें सोमपान करवीत असे व त्यांच्याच यज्ञांत असुरांनांही चोरून सोमरस देत असे. एकदा इंद्रानें हें कपट पाहून आपल्या वज्रानें त्या विश्वरूपास ठार मारिलें. त्यामुळें त्याला ब्रह्महत्येचें पाप लागले असतां; भूमि, अग्नि, वृक्ष व स्त्रिया ह्या चार ठिकाणीं वरप्रदानपूर्वक तें पाप विभागून देऊन इंद्र स्वता शुद्ध झाला. नंतर विश्वरूपाचा बाप त्वष्टा ह्यानें, द्वेषानें आपल्या यज्ञांत इंद्राला बोलाविला नसताही त्यानें तेथे बलात्कारानें शिरून सोमपान केलें. तेव्हां त्वष्ट्यानें संतापून इंद्रास मारण्याकरितां, राहिलेल्या सोमरसाचा; 'इंद्र शत्रु वर्धस्व' असा मंत्राचा ऊह करून अग्नीमध्यें आभिचारिक होम केला. हा मंत्र उच्चारतानां 'इंद्राचें छेदन करणारा असा तूं उत्पन्न हो' असा त्वष्ट्याच्या मनांतला अभिप्राय होता. त्याला इंद्राचा शत्रु (इंद्राचा छेदक) अशा तत्पुरुष समासास उपयोगी पडणारा 'समासस्यान्त उदात्तः' ह्या सूत्रानें होणारा अन्तोदात्त स्वर पाहिजे होता. ह्मणजे 'इंद्रशत्रुर्वर्धस्व' असा मंत्र ह्मणावयास पाहिजे होता. त्यानें इंद्राचा नाशक असा पुत्र, त्याला

झाला असता. परंतु घाईंत चुकीनें त्वष्टयाच्या तोंडातून इन्द्रशत्रुर्वर्धस्व असा मंत्राचा आद्युदात्त उच्चार निघाला. इंद्र शब्द आद्युदात्त आहे हें मागें इद्राबृहस्पती ह्या पदावर सिद्ध केलें आहे. ‘ बहुव्रीहौ प्रकृत्या पूर्वपदम् ’ ह्मणजे बहुव्रीहिसमासांत पहिल्या पदाचा स्वरच कायम राहतो. ह्या सूत्राप्रमाणें हा वरचा स्वर बहुव्रीहि समासासच उपयोगी असा असल्यामुळें, त्याचा अर्थ इंद्र आहे शत्रु ( विदारणकर्ता ) ज्याचा असा विपरीत होतो. ह्या कारणानें पुढें त्वष्टयास झालेल्या वृत्रनामक पुत्राचा, इंद्राच्याच हातून वध झाला ही इंद्रशत्रूची ( वृत्र ) कथा तैत्तिरीयसंहितेच्या द्वितीयकांडाच्या पांचव्या प्रपाठकांत व शतपथ ब्राह्मणाच्या प्रथमकांडस्थ पंचमप्रपाठकांत असून भागवत वगैरे पुराणांमधूनही जागजागीं आहे. असो. सारांश असा कीं, यज्ञादि प्रसंगांत मंत्रांचे स्वर व वर्ण अगदीं चुकतां उपयोगी नाहीं म्हणूनच स्वरवर्णोच्चारणाचे बोधक असणारें हें शिक्षाशास्त्र अगोदर अवश्य जाणून घेऊन, त्याप्रमाणें वेदमंत्राचे शुद्ध उच्चार केले असतां, इंद्रशत्रुप्रमाणें घात होणार नाहींत, व यथोक्त पूर्ण फळें मिळतील. ह्याकरितां हें शास्त्र वेदाचें नाक आहे असें मागें सांगितलें आहे. शिक्षा ज्ञानावांचून वेद नकटाच होय. आतां कोणी म्हणेल कीं, स्वरापराधाचें उदाहरण दिलें आहे तसें वर्णापराधाचें कां दिलें नाहीं तर ती गोष्ट उघड आहे. पहा, सकल शब्दाचा उच्चार शकल असा केला असतां वर्णभेदानें अगदीं विपरीत होतो. असेच कर, खर; दनु, धनु; वगैरे जागीं वर्णोच्चारणाचे दोष अत्यंत स्पष्ट दिसतात. म्हणून वर्णापराधाचें उदाहरण दिलें नाहीं, शिवाय स्वरभेदानें इतका घात केला तर वर्णभेद किती नाश

करील ही गोष्ट कैमुतिकन्यायानेंच सिद्ध आहे त्याबद्दल निराळें लिहायास नको. ॥ ५२ ॥

**अवक्षरं ह नायुष्यं विस्वरं व्याधिपीडितम् ॥**
**अक्षताशस्त्ररूपेण वज्रं पतति मस्तके ॥ ५३ ॥**

**अन्वयः** ॥ अवक्षरं (पठनम्) नायुष्यम् (अस्ति) ह; विस्वरं व्याधिपीडितम् (करोति) अक्षताशस्त्ररूपेण मस्तके वज्रं पतति ॥

**अर्थ.**—वेदपठनांत अक्षरें गाळली असतां, तें पठन आयुष्याची हानि करते. तसेंच स्वर चुकले असतां, व्याधींचे उपद्रव होतात. अशा मन्त्रोच्चारांनीं अभिमन्त्रित केलेल्या मन्त्राक्षतारूपी शस्त्राच्यारूपानें, यजमानाच्या मस्तकावर वज्रच पडत असतें. म्हणजे त्या शुभकारक मंत्राक्षता नव्हेत तर तें वज्रच आहे असें जाणावें. तात्पर्य मंत्र म्हणतानां, अक्षरें गाळूं नये व स्वर बिलकूल चुकवूं नये. ॥ ५३ ॥

**हस्तहीनं तु योऽधीते स्वरवर्णविवर्जितम् ॥**
**ऋग्यजुःसामभिर्दग्धो वियोनिमधिगच्छति ॥ ५४ ॥**

**अन्वयः** ॥ यस्तु हस्तहीनं स्वरवर्णविवर्जितं (च) अधीते (सः) ऋग्यजुःसामाभिः दग्धः (सन्) वियोनिम् अधिगच्छति ॥

**अर्थ**—मागें बेचाळिसाव्या व त्रेचाळिसाव्या श्लोकांत हस्तस्वर सांगितले आहेत, त्यावांचून व यथायोग्य स्वरवर्णांच्या उच्चाराशिवाय जो वेदपाठक ऋग्वेद यजुर्वेद आणि सामवेद ह्यांच्या शापानीं दग्ध होऊन पुढें वाईट योनींत जन्म पावतो. ॥ ५४ ॥

**हस्तेन वेदं योऽधीते स्वरवर्णार्थसंयुतम् ॥**
**ऋग्यजुःसामभिः पूतो ब्रह्मलोके महीयते ॥ ५५ ॥**

**अन्वयः** ॥ यः स्वरवर्णार्थसंयुतं हस्तेन (च उपलक्षितं) वेदम् अधीते, सः ऋग्यजुःसामभिः पूतः (सन्) ब्रह्मलोके महीयते ॥

**अर्थ**—जो वेदपाठी, हस्तस्वरानीं युक्त आणि योग्य स्वरवर्णोच्चार व अर्थज्ञान ह्यांसह वेदांचें अध्ययन करतो; तो पुरुष ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद ह्यानीं पवित्र केलेला असा होऊन ब्रह्मलोकीं जातो व तेथें अत्यंत पूजा पावतो. ॥ ५५ ॥

**शंकरः शांकरीं प्रादाद्दाक्षीपुत्राय धीमते ॥**
**वाङ्मयेभ्यः समाहृत्य देवीं वाचमिति स्थितिः ५६ ॥**

**अन्वयः**— ॥ शंकरः शाङ्करीं देवीं वाचं वाङ्मयेभ्यः समाहृत्य धीमते दाक्षीपुत्राय प्रादात् इति स्थितिः ( अस्ति ) ॥

**अर्थ व विवरण**:—आतां शिक्षाकार श्रीपिंगलाचार्य; रोचनार्थ, श्रद्धा-वाढविण्याकरितां आणि कृतज्ञता बुद्धीनें, ह्या शास्त्राच्या गुरुपरंपरेचा क्रम सांगतो. प्रारंभीं भगवान् श्रीशंकरांनीं, कल्याणकारक व व्याकरण प्रकाशक अशी पूर्वोक्त चतुर्दश सूत्ररूपी वाणी, वेदराशीतून काढून घेऊन दाक्षीनामक ऋषिकन्येचा पुत्र असणाऱ्या बुद्धिमान् अशा पाणिनि महर्षीला दिलीं, व तू शास्त्रकर्ता होशील असा त्याला वर दिला. अशारीतीनें मूळपरंपरेची प्रतिष्ठा-पना झाली. पुढें पाणिनीनें त्या चौदा सूत्रांच्या साहाय्यानें मागें अकराव्या श्लोकावर सांगितल्याप्रमाणें, प्रत्याहार बांधून व्याकरणशास्त्र रचलें, शिक्षा-

कारही त्याचाच अनुयायी असून त्याच्याच प्रत्याहार वगैरेंच्या आश्रयानें ही शिक्षा रचिली असल्यामुळें, शिक्षासूत्रकाराची व पाणिनीची परंपरा एकच आहे. त्याकरितां, ह्या परंपरेचा येथें मोठ्या गौरवानें निर्देश केला आहे. कथासरित्सागरांत कथापीठलंबकांतल्या चवथ्या तरंगामध्यें थोडक्यांत पाणिनीची कथा दिली आहे. सर्वांना समजण्याकरितां तीच येथें देतो. पूर्वी मगधदेशामध्यें पाटलीपुत्र नामक नगरांत वर्षनांवाच्या पंडिताजवळ वररुचि वगैरे नामांकित शिष्य शास्त्राध्ययन करीत होते. त्यामध्यें पाणिनि नांवाचा एक शिष्य फार जडबुद्धि होता. त्याला कांहींच येइना, तेव्हां वर्षाच्या भार्येनें त्याला बुद्धि येण्याकरितां, हिमालयावर तपश्चर्येस पाठविलें, तेथें त्याचें तीव्र तप पाहून श्रीशंकरानें प्रसन्न होऊन त्याला पूर्वोक्त चतुर्दश सूत्रें व शास्त्रकर्तृत्वाचा वर दिला. त्यानंतर पाणिनीनें प्रत्याहार करून अष्टाध्यायात्मक व्याकरणशास्त्र रचिलें; व पाटलीपुत्रांत परत येऊन बुद्धिमान् वररुचीबरोबर शास्त्रवाद सुरू केला. परंतु त्यांत आठव्या दिवशीं पाणिनीचाच पराभव होऊं लागला. इतक्यांत आकाशात श्रीशंकरानीं हुंकार केल्यामुळें पूर्वी प्रचलित असलेलें ऐन्द्र व्याकरण नष्ट होऊन वररुचि वगैरे सर्व इतर पंडित मूढ झाले; व त्यांचा पराभव झाला. पुढें वररुचीनेंही हिमालयावर तप करून शिवास प्रसन्न केल्यावर त्यास पाणिनीयशास्त्राचें पूर्ण ज्ञान आलें, व श्रीशंकराच्या आज्ञेनेंच पुढें वररुचीनें त्या शास्त्राचें वार्तिकांनी पूरण केलें. 'अइउण्' वगैरे चौदासूत्रें इतर वेदाप्रमाणेंच अनादिसिद्ध आहेत. म्हणूनच त्यानां अक्षर समाम्नाय [ अक्षरांचा वेद ] असें नांव आहे. शेवटचें ण् क् वगैरे

इत्संज्ञक वर्ण मात्र महेश्वरानें (शंकर) लावले आहेत; व त्या चतुर्दश सूत्रांचा द्रष्टाही (प्रकाशक) तोच असल्यानें त्यांना माहेश्वर सूत्रें असें म्हणतात. हीं सूत्रें ब्रह्मप्रतिपादकही आहेत, हें त्यांच्यावर असलेल्या काशिकानामक नंदिकेश्वराच्या व्याख्येवरून स्पष्ट कळेल. ह्यांच्या वेदत्वाबद्दल अधिक प्रमाणें शब्देन्दुशेखरग्रंथाच्या प्रारंभींच नागेशभट्टानीं दिली आहेत. ॥ ५६ ॥

**येनाक्षरसमाम्नायमधिगम्य महेश्वरात् ॥**
**कृत्स्नं व्याकरणं प्रोक्तं तस्मै पाणिनये नमः ॥ ५७ ॥**

**अन्वयः** ॥ येन महेश्वरात् अक्षरसमाम्नायम् अधिगम्य कृत्स्नं व्याकरणं प्रोक्तं तस्मै पाणिनये नमः ( अस्तु ) ॥

**अर्थ**=ह्या पुढच्या तीन पद्यांनी, व्याकरणशास्त्राचा कर्ता आचार्य पाणिनि ह्यास, कृतज्ञताबुद्धीनें स्तुति करून वंदन करितात. कारण शिक्षेमध्यें पाणिनीय संज्ञापरिभाषांचाच सर्वत्र उपयोग केला असल्यामुळें, त्याला ह्मणजे प्रथमाचार्याला वंदन करणें अवश्य आहे. ज्यानें महेश्वरापासून अक्षरांचा वेद ह्मणजे चतुर्दशसूत्रें मिळवून संपूर्ण व्याकरणशास्त्र उत्तमरीतीनें रचिलें; त्या पाणिनि महर्षीला नमस्कार असो, " इंद्रश्चंद्रः काशकृत्स्नापिशली शाकटायनः। पाणिन्यमरजैनेन्द्राः शब्दशास्त्रप्रवर्तकाः " ॥ ह्या प्रसिद्ध श्लोकावरून पाहतां इंद्र, चंद्र, काशकृत्स्न, आपिशलि, शाकटायन, पाणिनि, अमरसिंह व जैनेंद्र (हेमचंद्र) हे आठ व्याकरणशास्त्राचे प्रवर्तक (सूत्रकार) आहेत असे समजतें. परंतु त्यापैकीं पाणिनिशिवाय इतरांची व्याकरणें अपुरीं आहेत. कारण त्यांतील कांहीं व्याकरणें केवळ संस्कृत भाषेचींच आहेत; तर कांहीं केवळ वैदैक देशाचींच आहेत. पाणिनीनें मात्र वेद व भाषा ह्या दोहोंचेही

समग्र व्याकरण इतकें सुव्यवस्थित रीतीनें रचिलें आहे कीं, त्याच्या तोडीचीं सूत्रें इतर क्वचितच असतील. ह्याकरितां वर मूळांत ह्या व्याकरणाला कृत्स्न [ संपूर्ण ] असें विशेषण दिलें आहे, व म्हणूनच ह्याची वेदांगांमध्यें गणना झाली आहे. ॥ ५७ ॥

**येन धौता गिरः पुंसां विमलैः शब्दवारिभिः**
**तमश्चाज्ञानजं भिन्नं तस्मै पाणिनये नमः ॥ ५८ ॥**

**अन्वयः** ॥ येन विमलैः शब्दवारिभिः पुंसां गिरः धौताः अज्ञानजं तमश्च भिन्नं तस्मै पाणिनये नमः ( अस्तु ) ॥

**अर्थः**—ज्यानें शुद्ध शब्द स्वरूपी उदकांनीं, पुरुषांच्या वाणी धुतल्या, ह्मणजे त्यांच्या मधले दोष नाहींसे केले; व अज्ञानजन्य संशयरूपी अंधकार नाहींसा केला. त्या पाणिनि महर्षीला नमस्कार असो. महाभाष्यामध्यें पस्पशान्हिकांत पतंजलींनीं; 'रक्षोहागमलघ्वसंदेहाः प्रयोजनम्' ह्मणजे, वेदांचें रक्षण, यज्ञांतील विभक्ति वगैरेंचे ऊह [ फेरफार ], वेदाची सांगपठन करण्याविषयीं असलेली आज्ञा, थोडक्यांत भाषाज्ञान व संदेहनिवृत्ति हीं व्याकरणशास्त्राचीं मुख्य प्रयोजनें आहेत असें लिहून, त्याच विवरणांत व्याकरणाचे द्वारें संदेह निवृत्ति कशी होते, ह्याचें विस्तृत वर्णन केलें आहे. विस्तरभयास्तव येथें जास्ती उतारे देत नाहीं. ॥ ५८ ॥

**अज्ञानान्धस्य लोकस्य ज्ञानाञ्जनशलाकया ।**
**चक्षुरुन्मीलितं येन तस्मै पाणिनये नमः ॥ ५९ ॥**

**अन्वयः** ॥ येन अज्ञानान्धस्य लोकस्य चक्षुः ज्ञानाञ्जनशलाकया उन्मीलितम् [ अस्ति ] तस्मै पाणिनये नमः ( अस्तु ) ॥

**अर्थः**—अज्ञानरूपी तिमिरानें ( सारा ) अंध झालेल्या लोकांच्या दृष्टी, ज्यानें व्याकरणज्ञानरूपी अञ्जनाच्या सळईनें स्वच्छ उघडी केली, त्या पाणिनी महर्षीला नमस्कार असो. ह्याचा भावार्थ असा कीं, व्याकरणज्ञानापूर्वी वेद वगैरे मधल्या शब्दार्थाचें यथार्थ ज्ञान नसल्यामुळें, सामान्य लोकांच्या ज्ञानदृष्टी आंधळया होत्या परंतु पाणिनीच्या व्याकरणानें पुढें, शब्द अर्थ व स्वर वगैरे विषयांतले अज्ञान नाहींसे होऊन लोकांच्या ज्ञानदृष्टि निर्मळ झाल्या व त्यांना वेदादिकांचे ज्ञान नीट होऊं लागले. ५८ व ५९, ह्या दोन्हीं श्लोकांत रूपकालंकार स्पष्ट आहे ॥ ५९ ॥

**त्रिनयनमुखानिःसृतामिमां य इह पठेत्प्रयतः सदा द्विजः ॥ स भवति धनधान्यकीर्तिमानतुलसुखंच समश्नुते दिवीति दिवीति ॥ ६० ॥ इति श्रीपिंगलाचार्य विरचिता श्रीवेदांग-शिक्षा समाप्ता ॥**

**अन्वयः** ॥ यः द्विजः त्रिनयनमुखनिःसृताम् इमाम् ( चतुर्दशसूत्रीम् ) प्रयतः ( सन् ) पठेत्, सः इह धनधान्यकीर्तिमान् भवति दिविच अतुलसुखं समश्नुते ॥

**अर्थ व विवरण**—आतां शेवटीं व्याकरण शास्त्रास व या शिक्षे-सही मूळ आधार असलेल्या, स्वबुद्धिस्थ चतुर्दशसूत्ररूप दैवीवाणीच्या पठणाचें फळ सांगतात. गुहेंतून सिंह बाहेर निघतो, त्याप्रमाणें त्रिनेत्रधारी श्रीशंकराच्या मुखांतून निघालेल्या 'अइउण' वगैरे चतुर्दश सूत्रीचे, जो द्विजाति [ब्राह्मण क्षत्रिय, वैश्य] शुद्ध होऊन प्रयत्नानें नेहमीं पठन करतो तो पुरुष ह्या लोकीं

धन धान्य व कीर्ति इत्यादि ऐश्वर्यांनीं युक्त होतो, व पुढेंही स्वर्गलोकांत निरुपमसुखाचा उपभोग घेतो. अथवा हीं सूत्रें ब्रह्म प्रतिपादकही असल्यामुळें, नंदिकेश्वराच्या काशिकेंत सांगितल्याप्रमाणें त्यांचें चिंतन करील तर, तो पुरुष अतुल म्हणजे अप्रमेय जें मोक्षसुख त्यास मिळवील. ऋक्तंत्र व्याकरणांत शाकटायनानेंही असेंच म्हटलें आहे, त्यांचें वाक्य असें. "इदमक्षरंछन्दो वर्णशःसमनुक्रान्तं यथाचार्या ऊचुर्ब्रह्मा बृहस्पतये प्रोवाच बृहस्पतिरिन्द्रायेन्द्रो भरद्वाजाय भरद्वाज ऋषिभ्य ऋषयो ब्राह्मणेभ्यस्तंखल्विममक्षरसमाम्नायमित्याचक्षते न भुक्त्वा न नक्तं प्रब्रूयाद्ब्रह्मराशिरिति" ह्याचा अर्थ. हा अक्षरांचा वेद ( चतुर्दश सूत्री क्रमानें वर्णबोधक असून प्रथम ब्रह्मदेवानें ह्याचा बृहस्पतीस उपदेश केला. पुढें बृहस्पतीनें इंद्राला, इंद्रानें भरद्वाजाला व भरद्वाजानें इतर ऋषींनां, ह्यांचा उपदेश केला. त्यानंतर ऋषींपासून हा चतुर्दशसूत्ररूप वेद ब्राह्मणांनां मिळाला, असें आमचे गुरू सांगत आले, ह्याला अक्षरसमाम्नाय असें म्हणत असून ह्याचें जेवल्यावर अथवा रात्रीं पठन करूं नये; कारण हा अक्षरसमाम्नाय ब्रह्मतत्वाचें प्रतिपादन करणारा आहे. ह्या प्रमाणावरूनही, चतुर्दशसूत्राचें अनादित्व, पावित्र्य व महत्व दिसून येतें. सारांश, इतर सर्व वेदाप्रमाणेंच ह्यांच्याही पठनांतून पुण्य व अभ्युदय फळ असून, शुद्धता वगैरे पठन करणाराचे नियम ह्यानांही लागू आहेत, हें ध्यानांत ठेवावें. आचार्य नमस्कारापूर्वींच शिक्षाशास्त्राचें प्रयोजन व महत्व विस्तारानें सांगितलें आहे. षडंगांसहच वेदाध्ययन करावें अशी वेदाज्ञा आहे, आणि ह्याशिवाय शिक्षाध्ययनाचें फळही स्पष्ट ध्यानांत येण्यासारखें आहे, म्हणून येथें शिक्षापठणाची पुन्हां वेगळी फलश्रुति दिली नाहीं, असें समजावें. ह्या श्लोकाचें वृत्त पुष्पिताग्रा

आहे. इतर पाठांतरें स्वीकारल्यास उगीच छंदोभंग मात्र होईल. शेवटीं इतिकार व पदाची आवृत्ति ही शास्त्रसमाप्तीची द्योतक म्हणून लिहिली आहेत. येणेंप्रमाणें, पाणिनीच्या मतास अनुसरणाऱ्या श्रीपिंगलाचार्यानें रचिलेल्या शिक्षेचें मराठीभाषेंत केलेलें आमचें विवरण येथें समाप्त झालें. बऱ्याच पुस्तकांत शेवटीं 'पाणिनीय शिक्षा समाप्त' असें लिहिलें आहे, परंतु आम्हीं, पाणिनिनिबंदन शिक्षा व अष्टाध्यायींतील प्रक्रियाभेद वगैरे अंतः प्रमाणांवरून वर दिलेलाच पाठ योग्य आहे असें निश्चित केलें. शेवटीं मीं अत्यंत सद्भाव नम्र होऊन इतर वेदांगांचींही स्वभाषेंत व्याख्यानें करण्यास मज असमर्थास सामर्थ्य दे अशी परमात्म्याची प्रार्थना करतो; व त्याच्याच प्रेरणेनें पूर्ण झालेलें हें भाषांतर, त्याच वेदमार्ग प्रवर्तक जगच्चालक व जगदात्मक श्रीपरमेश्वराच्या सेवेस अर्पण करतो. ॥ ॐतत्सद्ब्रह्मार्पणमस्तु ॥

पौष शुद्ध ३ भौमवार शके १८३५
श्रीवैदिकधर्माश्रम पुणें.

शिवराम विद्याधर शिंत्रेशास्त्री.

# सार्वशिक्षा शुद्धिपत्र,

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १३ | २ | ह्याशिवय | ह्या शिवाय |
| १५ | १४ | विश्वेदेवासाऽअप्तुरः, | विश्वेदेवासो ऽ अप्तुरः; |
| १७ | १२ | विसर्ग. | विसर्ग, |
| १८ | २२ | स्युर्मूर्धन्या | स्युर्मूर्धन्या |
| २२ | १ | सवृंत | संवृतं |
| ३० | १८ | गद्‌ददितं | गद्गदितं |
| ३१ | २ | ( वेदन् ) | ( वदेत् ) |
| ३२ | ७ | एव | एव |
| ३५ | ११ | प्रत्याहारांत हे | प्रत्याहारांतले |
| ३५ | १५ | काष्ठ्यमनु– | कोष्ठ्यमनु– |
| ३६ | ९ | पाठ | पाठ– |
| ३८ | २ | ज्योतिषच | ज्यौतिषच |
| ४० | ७ | 'स्वस्तये' | 'स्वस्तये' |
| ४१ | २ | इमंम | इमं मे |
| ४१ | ९ | झालें. | झाले |
| ४२ | १३ | स्वः, | स्वः, |
| ४३ | २ | इद्राबृहस्पती | इन्द्राबृहस्पती |
| ४४ | ७ | त्यानतर | त्यानंतर |

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४५ | १० | भाषांतर सिद्धिचा | भाषांतरप्रसिद्धीचा |
| ४८ | १५ | इंद्र शत्रुवर्धस्व | इन्द्रशत्रुर्वर्धस्व |
| ४९ | २ | इद्राबृहस्पती | इंद्रावृहस्पती |
| ४९ | १२ | वेदमंत्राचे | वेदमंत्रांचे |
| ५० | १८ | जा वेदपाठक | जो वेद पढतो तो |
| ५१ | १६ | चतर्दश सूत्ररूपी | चतुर्दशसूत्ररूपी |
| ५५ | २ | पाणिनी | पाणिनि |
| ५५ | २० | शुध्र | शुद्ध |
| ५६ | २१ | पुष्पिताग्रा | अपरवक्त्र (वैतालीयभेद) |
| ५७ | ६ | पाणिनिवंदन | पाणिनिवंदन, |
| ५७ | ८ | सद्भाव नम्र | सद्भावनम्र |

---

## याच लेखकाचीं प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें.

सरकारनें टेक्स्टबुक म्हणून मंजूर केलेला.

१ संस्कृत पाठ संग्रह भाग पहिला.

( इंग्रजी पांचव्या इयत्तेकरितां )

किं. ८ आणे.

२ धर्मतत्वनिर्णयार्थ

## यापुढें प्रसिद्ध होणारीं पुस्तकें.

१ सार्थ वेदांग ज्यौतिष.

२ सार्थ पिंगल छंदःसूत्र.